


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १५ वें ] जानेवारी १९६२ [ अंक ४

सार-संकलन . . . . . . . .
भारतीय ज्योतिषशास्त्र . . . तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
मानव आणि विश्व : भारतीय व अभारतीय दृष्टिकोन . . . प्रा. नारायणशास्त्री द्रविड
हिंदी स्वातंत्र्याचा इतिहास . . . . श्री. वि. गो. दिघे
सत्याग्रह व लोकशाही . . . . . प्रा. र. चिं. बडवे
भारतांतील पोर्तुगीज वसाहतींचा अंत . . . . . श्री. श्री. शं. नवरे
गुरुदेव टागोरांचें उद्बोधक जीवन . . श्री. एस्. ए. कुलकर्णी
दोन रमा . . . . . . — श्री

— वाचकांचा पत्रव्यवहार पुस्तक परामर्श —

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.






प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष पंधरावें
अंक चवथा

जानेवारी
१९६२

संपादक-मंडळ

आचार्य **स. ज. भागवत**—प्रा. **वि. म. बेडेकर**—प्रा. **गोवर्धन पारीख** का. संपादक


| | | |
|---|---|---|
| सार-संकलन | | १– ६ |
| भारतीय ज्योतिषशास्त्र | तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ७–१३ |
| मानव आणि विश्व : भारतीय व अभारतीय दृष्टिकोन | प्रा. नारायणशास्त्री द्रविड | १४–१८ |
| हिंदी स्वातंत्र्याचा इतिहास | श्री. वि. गो. दिघे | १९–२६ |
| सत्याग्रह व लोकशाही | प्रा. र. चिं. बडवे | २७–३१ |
| भारतांतील पोर्तुगीज वसाहतींचा अंत | श्री. श्री. शं. नवरे | ३२–३७ |
| गुरुदेव टागोरांचें उद्‌बोधक जीवन | श्री. एस्. ए. कुलकर्णी | ३८–४१ |
| दोन रमा | – श्री | ४२–४५ |
| वाचकांचा पत्रव्यवहार | | ४६ |
| पुस्तक-परामर्श | | ४८–५७ |


**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. **म. शं. साठे** यांनीं **दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई** येथें छापून **प्रा. वि. म. बेडेकर** यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

**पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,**
**'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९**

**२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,**
**C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )**

**३ चौकशी : श्री. वा. वि कोनकर**
**१८८ एफ्. भीमरावबाडी, मुंबई २**
**फोन नं. २३५५४**






## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| | | किंमत |
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान | | |
| | (प्रा. सदाशिव आठवले) ... | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६–०–० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना | | |
| | (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | २–०–० |

## आशियांतील एक नवें राज्य

जगाच्या नकाशांत अजून " मलायाशिया " या राज्याचा उल्लेख होत नाहीं हें खरें. तथापि एका धाडसी व चतुर योजनेमुळें आग्नेय आशिया खंडांतील या नव्या राज्याच्या उदयासंबंधीं अधिकाधिक बातम्या मात्र येऊं लागल्या आहेत. ही योजना गेल्या मे महिन्यांत मलायाचे पंतप्रधान तन्कु अब्दुल रहमान यांनीं एका भाषणांत प्रथम पुढें मांडली; तेव्हांपासून तिला वेगानें चालना मिळाली आहे. मलयन फेडरेशन, सिंगापूर आणि ब्रिटनच्या आधिपत्याखालील बोर्निओचे तीन प्रदेश या सर्वांचें मिळून एक संयुक्त राज्य बनविण्यांत यावें असा या योजनेचा निष्कर्ष आहे.

मलाया व सिंगापूर यांच्या प्रतिनिधींचीं बोलणीं होऊन दोहोंच्या एकीकरणासंबंधीच्या घटनात्मक व्यवस्थेविषयीं त्यांच्यांत एकमत झालें. मलायाच्या आणि ब्रिटनच्या पंतप्रधानांची या संबंधीं लंडनमध्यें चर्चा होऊन 'बृहन्मलायाशिया फेडरेशन'च्या निर्मितीविषयींच्या कराराचें स्वरूप स्पष्ट करणारें संयुक्त पत्रक २३ नोव्हेंबर रोजीं निघालें आहे.

सिंगापूरच्या राजकीय व आर्थिक भवितव्याची तरतूद करणें हा या फेडरेशनचा एक प्रमुख हेतु होय. स्वतंत्र राजकीय व आर्थिक घटक म्हणून सिंगापूरचा निभाव लागणार नाहीं, हें एक कठोर सत्य आहे. सिंगापूरचे पंतप्रधान ली क्वान् यु यांनाहि तें मान्य आहे. सिंगापूरच्या संरक्षणाची व परराष्ट्रसंबंधांची जबाबदारी सध्यां ब्रिटनवर आहे. नव्या करारानुसार ही जबाबदारी मलायाशियन फेडरेशनवर पडेल. अंतर्गत व्यवस्थेचें नियंत्रणहि त्याच्याकडेच सोंपविलें जाईल.

या एकीकरणांत कांहीं अडचणी आहेतच. सिंगापूरमध्यें बहुसंख्य वस्ती चिनी लोकांची आहे. एकीकरणानंतर फेडरेशनमध्येंहि चिनी संख्या सर्वांत अधिक होईल. प्रजेंतील निरनिराळ्या गटांच्या परस्पर संबंधांबाबत आजवर सिंगापूरमध्यें स्वतंत्र धोरण अवलंबिण्यांत आलें आहे. मलाया व सिंगापूर यांच्यांतील करारानें या मुद्याची दखल घेतली असून कामगारांचे प्रश्न, आरोग्य व शिक्षण याविषयींचें नियंत्रण स्थानिक सत्तेकडे सोंपविण्यांत आलें आहे.

ब्रिटन व मलाया यांच्यांतील संरक्षक करार अधिक व्यापक करून नव्या फेडरेशनमधील अन्य प्रदेशांनाहि लागू करण्यांत यावा, असा निर्णय लंडनमधील चर्चेंत घेण्यांत आला. तसेंच सिंगापूरचा आरमारी तळ ब्रिटनच्या हुकमतीखालींच राहावा व जरूर तेव्हां मलायाच्या, राष्ट्रकुलाच्या व आग्नेय आशियांतील शांततेच्या रक्षणासाठीं साहाय्य म्हणून त्याचा उपयोग करण्याची फेडरेशननें ब्रिटनला मुभा द्यावी असेंहि ठरलें. दक्षिण व्हिएतनाममध्यें कम्युनिस्ट दडपणामुळें निर्माण झाल्या तशा अडचणी या प्रदेशांत निर्माण होऊं नयेत, अशी आपली तीव्र इच्छा असल्याचें मलायाच्या पंतप्रधानांनीं जाहीर केलें आहे.

ब्रिटिश बोर्निओंतील तिन्ही प्रदेश फेडरेशनमध्यें समाविष्ट करणें हा मूळ योजनेंतील एक महत्वाचा भाग आहे. ब्रुनाई या राज्यावर ब्रिटनचें सार्वभौमत्व नाहीं; फक्त त्याच्या परराष्ट्रसंबंधाची व संरक्षणाची जबाबदारी ब्रिटनकडे आहे. यामुळें नव्या फेडरेशनमध्यें सामील होण्याविषयीं ब्रुनाईच्या सुलतानांना विचारण्यांत यावें, असें लंडनच्या चर्चेंत ठरलें. उरलेले दोन प्रदेश म्हणजे सारावाक व उत्तर बोर्निओ. या दोन्ही वसाहती ब्रिटनच्या असल्यामुळें तद्विषयक प्रत्यक्ष जबाबदारी ब्रिटनकडे आहे. त्यांना फेडरेशनमध्यें सामील करून घेण्यापूर्वीं तेथील जनमताचा कौल घेण्यांत यावा असें ठरलें आहे. यासाठीं लवकरच ब्रिटन व मलाया यांच्या प्रतिनिधींचें एक कमिशन नेमण्यांत येईल. तें या प्रदेशांना प्रत्यक्ष भेट देऊन लोकमताचा अंदाज घेईल अशी अपेक्षा आहे.

## अरब ऐक्याचें भवितव्य

गेलीं तीन वर्षें हीं गमाल अब्देल नासेर यांच्या दृष्टीनें दुर्दैवाचींच म्हटलीं पाहिजेत. १९५८ च्या








आरंभीं इजिप्तचा हा नेता सुएजप्रकरणांत ब्रिटन व फ्रान्स यांचेवर मिळवलेल्या यशानें तळपत होता. संयुक्त अरब प्रजासत्ताकाच्या उपक्रमांत सिरिया व येमेन सामील झाले होते आणि इराक, लेबेनॉन व जॉर्डन हेहि त्याचें नेतृत्व स्वीकारतील अशीं चिन्हें दिसत होतीं. अटलांटिक महासागरापासून इराणच्या आखाता-पर्यंत त्याच्या नेतृत्वाखालीं प्रचंड मुस्लिम-अरब राज्याची उभारणी करण्याच्या प्रयत्नांत त्याचे अनुयायी गढून गेले होते.

तथापि अकस्मात् ही लाट ओसरूं लागली! १९५८ च्या जुलै महिन्यांत अब्दुल करीम कासीमनें इराकची प्रतिगामी राजवट उलथून टाकली. परंतु नासेरशीं सहकार्य करण्याचें मात्र काळजीपूर्वक टाळलें. नंतर लवकरच लेबेनॉनमधील राजवट बदलली, पण तोहि देश इजिप्तपासून दूरवरच राहिला. जॉर्डनमध्यें तर ब्रिटन व अमेरिका यांच्या आर्थिक व लष्करी साहाय्यानें हुसेननें नासेरवादी आंदोलन दडपून टाकलें!

तथापि सर्वांत मोठा धक्का नासेरला सिरियानें दिला!! तेथील कांहीं लष्करी अधिकाऱ्यांनीं नुकतेंच इजिप्त विरुद्ध बंड करून रक्तपातावांचून नव्या मुलकी राजवटीची यशस्वीपणें स्थापना केली. दमास्कसमधील या नव्या राजवटीविषयीं नासेर अजून शांतच आहे. सिरियांतील क्रांतीबद्दल बोलतांना तो म्हणाला: "सिरियन प्रतिनिधी जेव्हां मला प्रथम भेटले तेव्हांच मी त्यांना सांगितलें होतें कीं" ऐक्य अत्यंत कठिण आहे. तें स्थापन होतांच त्याचे शत्रु पुनः धडपड करूं लागतील. "तथापि 'सिरिया धोक्यांत आहे. त्याचें राष्ट्रीय अस्तित्वच नष्ट होण्याचा संभव आहे. सिरियाचा ऐक्यावाचून निभाव लागायचा नाहीं' असें त्यांचें म्हणणें पडलें. मी या ऐक्याविषयीं प्रथम पासूनच शंकित होतो."

नासेरचें हें म्हणणें खरें आहे. एकीकरणाची विनंति सिरियानेंच केली होती. तेव्हांची सिरियांतील राजकीय परिस्थिति गोंधळाची होती. समाजवादी किंवा कम्युनिस्ट सत्तेवर येण्याचा दाट संभव होता. यामुळें त्यावेळच्या अध्यक्षांनीं संयुक्त राजवट निर्माण करण्याचा आग्रह धरला होता. तथापि हा सोयीचा संबंध कधींच सुखावह ठरला नाहीं. आपल्या बहुतेक अडचणी संयुक्त अरब प्रजासत्ताकाच्या उत्तर भागांतीलच होत्या असें नासेर म्हणतो, पण यांत आश्चर्य नाहीं. "दमास्कसमध्ये खुद्द महंमदाला देखील राज्य करणें कठीण आहे" अशी एक प्रसिद्ध अरब म्हण आहे.

सिरियन जनतेचें राहणीचें मान अधिक चांगलें आहे. सांस्कृतिक दृष्टीनें सिरिया पुढारलेला आहे. त्याला या दोन्ही गोष्टींची जाणीवहि आहे. तथापि सिरियन नेते भांडखोर, रुक्ष आणि कार्यक्षमतेच्या अभावाबद्दल प्रसिद्ध आहेत. गेल्या बारा वर्षांत राज्य चालविण्याच्या सामर्थ्याचा अभाव त्यांनीं वेळोवेळीं प्रकट केला आहे. दुबळी संसदीय लोकशाही व गलथान हुकूमशाही यांचा लपंडाव तेथें सुरू आहे. संयुक्त अरब प्रजासत्ताकांत सामील झाल्यानंतरहि तेथील परिस्थिती फारशी सुधारली नाहीं. इजिप्तची लोकसंख्या सिरियाच्या पांचपट. औद्योगिक दृष्ट्या इजिप्त पुढारलेला. यामुळें संयुक्त राजवटींत साहजिकच इजिप्तचें प्राबल्य अधिक राहिलें. वरिष्ठ अधिकारपदावर इजिप्शियन आले. स्थानिक (सिरियन) पक्ष नाहींसे करण्यांत आले. एकच मंत्रिमंडळ असल्यानें कैरोंत सत्तेचें केंद्रीकरण झालें. तीन वर्षांपूर्वी एकीकरण घडवून आणण्यांत पुढाकार घेणारापैकीं अवघा एकच नेता १९६१ मध्यें सत्तेवर होता. तो म्हणजे गुप्त पोलीस संघटनेचा प्रमुख कर्नल अब्देल हमीद सेराज हा होय. तो देखील इजिप्तच्या मार्शल अब्देल हकीम अमेरच्या हाताखालींच होता.

एकीकरणापूर्वी सिरियांत आर्थिक सुबत्ता होती. नंतर ती नाहींशी होऊं लागली. अर्थात् तीन वर्षे लागोपाठ दुष्काळ पडला याला कांहीं नासेर जबाबदार नाहीं. पण इजिप्तमधील "अतिरिक्त" शेतकऱ्यांना अधिकृत रीतीनें सिरियांत रवाना केल्यानें परिस्थिती अधिकच चिघळली. त्यांतच शेतीविषयक सुधारणांच्या कार्यक्रमामुळें जमीनदार व वजनदार मध्यमवर्ग, दोन्हीहि नाखूष झाले. बँका व खाजगी कंपन्यांचें राष्ट्रीयीकरण, करवाढ, व्यापारावरील निर्बंध इ. इ. इजिप्शियन "समाजवादा"चीं धोरणें सिरियांत अमलांत आल्यानें सिरियन पौंडाची किंमत घसरूं लागली. सिरियन मध्यमवर्गाला नासेरचें आकर्षण फारसें नव्हतेंच, पण आतां तो वर्ग रुष्ट होऊं लागला. अधि-











अनुक्रमणिका

कारावरून उचलबांगडी झालेले जुने राजकीय पुढारी, गुप्त पोलीसांनीं हैराण केलेले कम्युनिस्ट, इजिप्शियन अधिकाऱ्यांच्या हाताखालीं काम करावें लागणारे सिरियन सैन्यांतील अधिकारी इ. इतर असंतुष्ट गट तेथें होतेच.

सेराजला कैरोंत बोलावण्यांत आलें आहे ही संधी साधून बंडाचा उठाव झाला; बंड कल्पनेबाहेर यशस्वी झालें. डॉ. कुझबारीच्या नेतृत्वाखालीं नवी राजवट स्थापन झाली. सर्व गटांना सर्व प्रकारचीं आमिषें दाखविण्याचा या राजवटीनें आरंभ केला असून त्याबरोबरच २७००० इजिप्शियन अधिकाऱ्यांची हकालपट्टीहि केली आहे. तथापि ही राजवट किती काळ टिकेल हा एक प्रश्नच आहे. सिरियांत पुनः डावे गट डोकें वर काढण्याचा संभव आहे. एक दोन वर्षांतच या राजवटीवरील विश्वास ढासळूं लागेल व पुनः एकीकरणापूर्वीचाच गोंधळ सुरू होईल.

सिरियांतील राजकीय वातावरण ध्यानांत घेतां तेथें डाव्या गटांचा अखेरीस वरचष्मा होणार हें निश्चितच आहे. अनेक वर्षांच्या बेकायदेशीर अस्तित्वानंतर पुनः कम्युनिस्ट पक्ष हा सर्वांत प्रभावी राजकीय घटक बनला आहे. बंडानंतर लवकरच बेरुटमधील मध्यवर्ती कचेरींतून या पक्षानें एक पत्रक काढून "साम्राज्यशाही-विरुद्ध विजय" म्हणून बंडाचें स्वागत केलें व "राष्ट्रीय लोकशाही आघाडी" प्रस्थापित करण्याची मागणी केली आहे. त्यानंतर अवघ्या तीन दिवसांतच दमास्कसमधील नव्या राजवटीला मान्यताहि दिली आहे.

'बआथ' ही सिरियांतील दुसरी डावी चळवळ. तथापि तिच्यांत नासेरवादी व नासेरविरोधी असे दोन तट पडले असून त्यांच्यांतील कलह विकोपास गेला आहे. १९५७ सालीं या चळवळीनें प्रथम कम्युनिस्टांशीं सहकार्य केलें व नंतर त्यांना नासेरकडे वळणें अपरिहार्य झालें. आज बंड यशस्वी झालें असलें तरी सिरियांत नासेरवादी आंदोलन बराच काळ चालूं राहील यांत संशय नाहीं. इतिहासाची पुनरावृत्ति होण्याचा संभव आहे.

मध्यपूर्वेत राजकीय निष्ठा स्थिर वा सुसंगत असत नाहींत हें प्रसिद्ध आहे. आजची कैरोविरोधी आघाडी कदाचित् फार काळ टिकणारहि नाहीं. इजिप्तचा हुकूमशहा पुनः दमास्कसमध्यें विजयानें प्रवेश करीलहि. पण तसें न झाल्यास सिरियांतील बंड ही नासेरवादाच्या अंताची नांदीहि ठरण्याचा संभव आहे ! !

## पाश्चात्त्य राष्ट्रांतील मतभेदांचा धोका ( ? )

दि. १४ डिसेंबर १९६१च्या "न्यूयॉर्क हेरल्ड ट्रिब्युन" च्या युरोपीय आवृत्तींतील एका लेखांत वॉल्टर लिप्मन् लिहितातः

"कटांगांतील युद्ध आणि पॅरिस येथें झालेले मतभेद यांत पाश्चात्त्य राष्ट्रांच्या एकजुटीला तडा जात असल्याचा पुरावा आपणांस दिसूं लागला आहे. हें आगामी संकटाचें एक पूर्वचिन्हच होय ! पॅरीसमध्यें मुख्यतः द गॉलनें मतभेद व्यक्त केला असून त्याचा परिणाम केवळ बर्लिन प्रश्नावरील पाश्चात्त्य धोरणावरच नव्हे तर सर्व 'नाटो' संघटनेवरच होण्याचा संभव आहे. कटांगा प्रकरणांत संयुक्त राष्ट्र संघटनेला पाठिंबा देणारें अमेरिका हें एकटेंच महत्त्वाचें पाश्चात्त्य राष्ट्र आहे. ही परिस्थिती धोक्याची होय. युद्धतहकुबी व समझोता लवकर न झाल्यास सर्व ऑफ्रिका खंडाला त्याचे दुष्परिणाम भोगावे लागतील !

"कॉंगोच्या प्रश्नावर चांगला उपाय कोणाजवळ असल्यास तो पुढें मांडणें ही अत्यंत महत्त्वाची सेवा ठरेल; मला अशी व्यक्ति माहीत नाहीं. बेल्जियमनें कसलीहि पूर्वतयारी न करतां या राष्ट्राला स्वातंत्र्य देण्याचा निर्णय घेतला व लगेच कायदा व सुव्यवस्था राखण्याबाबत व राज्य चालविण्याबाबत कॉंगोची असमर्थता स्पष्ट झाली ! खरें म्हणजे राष्ट्र म्हणून कॉंगो अस्तित्वांतच नव्हतें. एकमेकांशीं लढणाऱ्या अनेक टोळ्या ( ट्राइब्ज् ) तेथें होत्या.

"या पोकळींत उत्तरेकडे स्टॅन्लेव्हिल्च्या सभोंवतीं व पूर्वेकडील प्रदेशांत सोव्हिएटनें ठाण मांडलें. लुमुंबाला पाठिंबा दिला. आतां त्याच्या मृत्यूनंतर गिझेंगाला पाठिंबा देण्याचा उपक्रम सुरू केला आहे. दक्षिणेकडील कटांगाच्या समृद्ध प्रदेशांत युरोपियांनीं बस्तान बसवलें व शोम्बेना पाठिंबा देण्यास आरंभ केला. सोव्हिएट व पाश्चात्य राष्ट्रें यांच्यांतील आंतरराष्ट्रीय युद्धाची, व प्रत्यक्षांत गोरे व काळे यांच्या लढाईचीच अशाप्रकारें सर्व सिद्धता झाली आहे हें ध्यानांत आल्यामुळें युनोचे सह-कार्यवाह द दाग हॅमरशूल्ड यांच्या









अनुक्रमणिका

सूचनेवरून संयुक्त राष्ट्र संघटनेने निर्णय घेतला. या निर्णयामुळें लढणाऱ्या या टोळ्यांत शांतता प्रस्थापित करण्याच्या हेतूनें युनोला हस्तक्षेप करावा लागला. पाश्चात्त्य राष्ट्रांत रागाची व संशयाची प्रक्रिया निर्माण झाली. शांतता प्रस्थापित करण्याच्या कार्यांत पाश्चात्त्य राष्ट्रांच्या पाठिंब्यावाचून यश आल्यास तें एक महदाश्चर्यच म्हणावें लागेल !

"युनोचा हस्तक्षेप कठीणच नव्हे तर अत्यंत अप्रियहि ठरला हें स्वाभाविकच आहे. तथापि हा मामला इतका सोपा नाहीं. युनो शोम्बेला, तो कम्युनिस्ट विरोधी असल्यामुळें, दडपून टाकूं पहात आहे हें म्हणणें खरें नाहीं. कॉंगोंतून कटांगा बाहेर पडूं नये यासाठीं युनोचे प्रयत्न आहेत. डावपेचांत चुका असतील; पण युनोच्या हस्तक्षेपाचा हेतु योग्य असाच आहे. कटांगा अलग होऊन ऱ्होडेशिया, आंगोला, द. आफ्रिका, इत्यादि गोऱ्यांच्या वर्चस्वाखालील प्रदेशांसारखा बनल्यास उर्वरित कॉंगोला आर्थिक स्थैर्य प्राप्त होणें कठिण आहे. सर्वच नीग्रो आफ्रिका मॉस्कोकडे कलण्याचा संभव त्यायोगें निर्माण होईल व तो टाळणें कठीण जाईल. सोविएट पाठिंब्यानें पुढें येणारा नीग्रो आफ्रिका व गोऱ्यांच्या वर्चस्वाखालील दक्षिणेकडील श्वेत आफ्रिका यांच्यांतील युद्धाची कल्पना देखील भयावह आहे."

"एलिझबेथव्हिलमधील युनोचें सैन्य वा न्यूयॉर्कमधील युनोची कचेरी हा प्रश्न सोडवूं शकतीलसें मला वाटत नाहीं. यावरील उपाय अमेरिका व तिचीं युरोपीय मित्रराष्ट्रें–विशेषतः ग्रेट ब्रिटन–यांच्या समझोत्यांतूनच निघूं शकेल. कटांगांत युद्धतहकुबीची मागणी ब्रिटन आतां करीत आहे. कटांगांतील राजवटीवर आवश्यक दडपण आणून कायदेशीररीत्या प्रस्थापित झालेल्या मध्यवर्ती सरकारशीं करार करण्यासाठीं ब्रिटननें त्याला प्रवृत्त केल्यास या मार्गाचा पाठपुरावा करतां येईल. कॉंगोला दीर्घकालीन अडचणींतून बाहेर काढायचें झाल्यास मोठ्या राष्ट्रांनीं कटांगाच्या फुटिर धोरणास एकमतानें विरोध करून तें बदलून घेणें जरूर आहे."

"द गॉलकडून या बाबतींत विशेष अपेक्षा बाळगतां येत नाहीं. त्याच्या सर्व जीवनावरून असें दिसतें कीं, तो जेव्हां असमर्थ असतो तेव्हां अधिकच ताठर बनतो. अल्जिरिया व फ्रान्समधील परिस्थिति जोंवर आणीबाणीची राहील तोंवर बाहेर सर्वच बाबतींत : युनो, नाटो संघटना, संयुक्त बाजारपेठेची व्याप्ती वाढविणें, वा बर्लिनचा प्रश्न – सगळीकडेच तो अडथळे निर्माण करणार."

"तथापि बर्लिनचा प्रश्न कांहीं अमर्याद काळपर्यंत बाजूला ठेवतां येत नाहीं. याला सबळ कारणें आहेत. पश्चिम बर्लिनचा मार्ग खुला ठेवण्याची कबुली क्रुश्चेव्हनें दिली असून अधिक बोलणीं करण्याची तयारी त्यानें दाखवली आहे. आतां बोलणीं सुरू न केल्यास पूर्व जर्मनीशीं स्वतंत्रपणें 'शांतता करार' करण्यासाठीं त्याला प्रवृत्त करण्यासारखें होईल. तसें झाल्यास नंतर हेर अल्बिक्टशीं बोलणें फारसें समाधानकारक ठरेल अशी आशा नाहीं. द गॉलचें म्हणणें असें कीं तूर्त क्रुश्चेव्ह कांहीं काळ तरी कोणतीच महत्त्वाची गोष्ट करणार नाहीं. कां ? कारण असें कीं दोन बर्लिनमध्यें यानें भिंत उभारली आहे. यामुळें पश्चिम बर्लिनचा आसरा वाटेनासा झाला आहे; त्याचें आकर्षण उरलेलें नाहीं. लवकरच एक होणाऱ्या भावी जर्मनीची राजधानी म्हणून तिकडे आतां कोणी पाहात नाहीं. पश्चिम बर्लिनचें नीतिधैर्य खचत असल्याची कबुली जर्मन प्रवक्ते गेल्या कांहीं दिवसांत देऊं लागले आहेत."

"चालू परिस्थिति सतत कायम राखण्याचा देखील कांहीं न करणें हा मार्ग नव्हे. आणि १३ ऑगस्टनंतर परिस्थितीच बदलली आहे. कांहीं न करणें म्हणजे आजची चिंतेची, भीतीची, अवस्था कायम ठेवणें. पश्चिम बर्लिनचे नागरीक या अवस्थेंत किती दिवस राहणार ? त्यांचें स्वातंत्र्य व शहराचें दळणवळण कायम राहील अशी तरतूद तांतडीनें झाली पाहिजे. द गॉलनें विरोध केल्यास असा करार आपणांस करतां येणार नाहीं हें खरें. पण तो करणें शक्य आहे कीं नाहीं हें शोधून पाहाण्यास अडचण नसावी. तो अशक्य ठरला तर मात्र पश्चिम बर्लिनचें भवितव्य काळेंकुट्ट आहे असें म्हणावें लागेल व आजच्या परिस्थितींतला ताणहि वाढत जाईल. पण तो शक्य आहेसें दिसून आल्यास द गॉल त्याला विरोध करूं शकणार नाहीं व जगाला कांहीं काळ तरी उसंत मिळूं शकेल."

## काँगो : एक ब्रिटिश दृष्टिकोण

" कटांगांतील पाशवी युद्धामुळें अलिकडे ब्रिटनची जितकी नाचक्की झाली तितकी दुसऱ्या कोणत्याहि घटनेनें झाली नसेल ! कितीहि सदोष असले तरी आपले हेतु राजकीय आहेत असें सुएझ प्रकरणांत ब्रि० सरकार म्हणूं शकत होतें. कटांगाच्या बाबतींत आतां उघड उघड बनियेगिरीचें प्रदर्शन झालें आहे. सुमारें १५ कोट पौंड भांडवल असलेल्या "युनियन मिनिएर कंपनी" चे हितसंबंधीच शोम्बेबद्दल येथें आरडाओरड करीत आहेत ! शोम्बेला पाठिंबा देण्याच्या कामीं त्यांनीं यशस्वीपणें सरकारचें मन वळविलें आहे. परिणामीं युनोच्या एका थोर सरचिटणीसाचें मरण ओढवलें, युनोचे कित्येक अधिकारी व सैनिक यांची हत्या झाली, व हजारों आफ्रिकी लोकांची कत्तलहि !! अशा प्रकारें अनेक निरुपद्रवी लोकांचें रक्त सांडून कटांगांतून मिळणाऱ्या नफ्यावर हात मारला जात आहे !"

" ही एक शोकांतिकाच होय. दैवदुर्विलास हा कीं कटांगाचे हे पुरस्कर्ते आपल्या करणीनेंच सर्वस्व गमावून बसणार आहेत. काँगोंत प्रभावी केंद्रीय सत्तेचा पुरस्कार त्यांनीं केला असता तर त्या योगानें युरोपीय खाणींच्या मालकीला बाध आला असताच असें नाहीं; तसें होण्याचें कारणहि दिसत नव्हतें. आतां मात्र या खाणी सरकारजमा होणें व युरोपीयांची हकालपट्टी होणें निश्चित झालें आहे. स्वतंत्र राज्य अस्तित्वांत येण्याचा कधींच संभव नव्हता. शोम्बे व त्याचे मंत्री हीं सुरवातीस बेल्जियमचीं बाहुलीं होतीं. हळूहळू ते आतां युरोपीय मालकांचे भाडोत्री रखवालदार बनले आहेत ! कटांगाचें स्थैर्य ही एक बाहेरच्या जगाला दिलेली थाप होती. आतां होत असलेल्या रक्तपातांत तीहि उघड पडली आहे. युनोला अराजकावांचून दुसरा पर्याय नाहीं हें ब्रिटिश सरकारलाहि मान्य करावें लागत आहे."

" सर्व घडामोडींवरून डॉ. ओब्रायन यांचें निदान अचूक असल्याचें सिद्ध झालें आहे. आरंभींच्या बंडाच्या वेळींच काँगोंत स्थिर राजवट निर्माण करायची झाल्यास कायदा व सुव्यवस्था याबद्दलची जबाबदारी युनोलाच घ्यावी लागेल हें स्पष्ट झालें होतें. हें मत पुनः पुनः केलेल्या ठरावांच्याद्वारें सिक्युरिटी कौंसिलनें स्वीकारलें होतें. ब्रिटननें या ठरावांना पाठिंबा दिला होता. या ठरावानुसारच सप्टेंबरमधील डॉ. ओब्रायन यांचें वर्तन होतें. शांततेच्या मार्गानें शोम्बेचें मन वळविण्याचा भरपूर प्रयत्न करूनहि जमेना तेव्हां त्यानें दंडाचा वापर करावा अशी त्यास अनुज्ञा देण्यांत आली. किती सामर्थ्य वापरावें लागेल व ब्रिटिश व फ्रेंच राज्यकर्ते कितपत दगलबाजी करतील या विषयीं त्याचा अंदाज चुकला ही त्याची खरी चूक ! आतां आवश्यक तें सामर्थ्य त्याला पुरविण्यांत आलें आहे व यापुढें अडथळे करीत राहाण्याचा फारसा उपयोग नाहीं हें ब्रिटन व फ्रान्सला समजून चुकलें आहे. काँगोचा प्रश्न अशा प्रकारें सुटण्याच्या मार्गावर आल्याचीं चिन्हें दिसत आहेत."

" ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं आतां आजवरच्या धोरणामुळें झालेल्या हानीचा विचार केला पाहिजे. सोविएट प्रचाराला त्या योगानें प्रथमच वस्तुनिष्ठ आधार मिळून अमर्याद हानी झाली आहे. त्याचप्रमाणें वसाहतींचा प्रश्न आला कीं ब्रिटनचा शब्द कवडी मोलाचा असतो हा अमेरिकेचा संशय अनेक पटींनीं बळकट झाला आहे. आफ्रिकी व आशियाई राष्ट्रांच्या दृष्टीनें राजकीय जाळपोळींत स्वतःची पोळी पिकवून घेण्याच्या असफल उचापतींत ब्रिटन सांपडला आहे. आणि सर्वांत वाईट म्हणजे युनोच्या निर्णयाबाबत व्हेटो उघडपणें वापरण्याचें नैतिक धैर्य नसल्यामुळें त्या निर्णयाला आंतून सुरुंग लावण्याचा ब्रिटन कसा खटाटोप करतो याचें कटांगा हें एक उदाहरण आहे, असें अनेकवार घडत आलें आहे असा अभिप्राय ओब्रायननें व्यक्त केला आहे. अशा प्रकारें सामुदायिक शांतता व जागतिक सुव्यवस्था यांचा ब्रिटन हा एक छुपा शत्रु होय असें समजलें जात आहे.

" आतां ब्रि. सरकारनें तांतडीनें, अमेरिकेचे अध्यक्ष केनेडी यांच्याप्रमाणेंच, युनोच्या निर्णयाला संपूर्ण पाठिंबा दिला पाहिजे. युनोच्या सैन्याला रसद पुरविणें व हवाई दलाचें साहाय्य देणें या गोष्टी व्यावहारिक पातळीवरूनहि करतां येतील. ब्रिटनला उशीरा कां होईना पण खराखुरा पश्चाताप होत आहे हें सिद्ध करायचें झाल्यास याहूनहि अधिक कार्य करावें लागेल.








कांहीं परराष्ट्रीय अधिकाऱ्यांचा आजवरच्या अड-थळ्याच्या धोरणाशीं स्पष्ट संबंध होता म्हणून त्यांना दूर करावें लागेल. या धोरणाचे खरे पुरस्कर्ते लॉर्ड होम यांनीं व्यक्तिशः आपली भूमिका बदलल्याचें स्पष्ट केलें पाहिजे. आम्हाला त्यांचा राजिनामा मागण्याचा हक्क आहे हें उघड आहे; व ते तो देणार नाहींत हेंहि तितकेंच उघड आहे. गुन्हा करणारानें निघून जावें ही गोष्ट मॅक्मिलन् सरकारच्या नैतिक भूमिकेंत बसूं शकत नाहीं. ''

" न्यू स्टेट्स्मन् अँड् नेशन् ''च्या ८ डिसेंबर १९६१ च्या अंकांतील एका लेखाचा हा सारांश आहे.

## आणि दुसरा दृष्टिकोण :

लंडन ' टाईम्स 'चा खास बातमीदार ता. ७ डिसेंबर १९६१ च्या बातमीपत्रांत लिहितो :

" गेल्या आठवड्यांत युनोचे हंगामी सरचिटणीस यु थां यांनीं कॉंगोचा प्रश्न सोडविण्यासाठीं टप्प्या-टप्प्यांनीं प्रयत्न करण्याची एक योजना आपण लवकरच पुढें मांडणार असल्याचें जाहीर केलें. त्याबरोबरच शोम्बेनें युनोवर केलेल्या एका आरोपाचें निराकरण करतांना " शोम्बे असलीं विधानें करूं शकतो. माहीतगार लोकांजवळ चौकशी करतां " तो अस्थिर मनाचा असल्याचें मला दिसून आलें आहे." असें ते म्हणाले. " संयुक्त राष्ट्रांचें सैन्य नजिकच्या भविष्यकाळांत कॉंगोंतून काढून घेतलें जाण्याची कितपत शक्यता आहे ? " या प्रश्नाविषयी बोलतांना ते म्हणाले : तीन निरनिराळे संभाव्य पर्याय या बाबतींत दिसतात—

१. युनो परिषद व सिक्युरिटी कौंसिल यांनीं वेळो-वेळीं केलेल्या ठरावांची समाधानकारक अंमलबजावणी,

२. अंमलबजावणी होवो कीं न होवो, कौंसिलनें सैन्य परत घेण्याचा निर्णय घेणें.

३. ठरावांची अंमलबजावणी करण्यासाठीं युनोजवळ पुरेशी साधनसामुग्री नसल्यानें निर्माण होणारी परि-स्थिती, असें झाल्यास मी वस्तुस्थिती कौंसिलपुढें ठेवीन व त्याबद्दल कौंसिलला निर्णय घ्यावा लागेल.

शोम्बेनें पॅरिस येथून युनोनें कटांगांत आक्रमण केल्यास त्याचा तीव्र प्रतिकार केला जाईल अशी घोषणा केल्याचें नमूद करून या प्रतिनिधीनें कटांगांतील युनोचे खास प्रतिनिधी डॉ. ओब्रायन यांच्या राजिनाम्याचा उल्लेखहि केला आहे. हा राजिनामा देतांना ओब्रायन म्हणतो : " संघटनेच्या आंत व बाहेर दोन्ही-कडे आरंभापासून मला सतत वाढती टीका सहन करावी लागली. ती बेल्जियम कडून नव्हे तर सिक्युरिटी कौंसिलच्या दोन कायमच्या सभासदांकडून ! म्हणजे ब्रिटन व फ्रान्सकडून. यांतील कोणत्याहि एकानें विरोध केला असता तर कौंसिलचे ठराव होऊंच शकले नसते. तथापि तसा विरोध त्यांनीं केला नाहीं; पण ठरावांच्या अंमलबजावणीला त्यांनीं तीव्र प्रतिकार सुरू केला. "

डॉ. ओब्रायन यांच्या आरोपांचा इन्कार करून हा प्रतिनिधी म्हणतो कीं, १३ सप्टेंबरच्या पराभवानंतर कॉंगोंत शांतता प्रस्थापित करण्यासाठीं सामर्थ्याचा कितपत उपयोग करावा लागेल याबद्दलचे सर्व अंदाज चुकले आहेत. ओब्रायनचें म्हणणें आयर्लंडच्या सर-काराला मान्य नाहीं ही अत्यंत समाधानाची गोष्ट आहे. इंग्लंड व आयर्लंड दोहोंच्याहि मतानें कटांगाचा प्रश्न सामर्थ्यानें सुटण्यासारखा नाहीं. त्यासाठीं शांतता-पूर्वक समझोत्याचा मार्ग अवलंबिला पाहिजे.








श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# भारतीय ज्योतिषशास्त्र*

दृक्-प्रत्ययास धरून व आधुनिक पाश्चात्य सूक्ष्म ज्योतिषशास्त्रास अनुसरून भारतीय ज्योतिषशास्त्राची परंपरा पुढें चालू ठेवावी यांत आतां मतभेद राहिलेला नाहीं. पंचांग-सुधारणेची कल्पना आतां पचली आहे. भारतीय परंपरा व आधुनिक प्रगति यांचा पूर्ण समन्वय करण्याचा हा काळ आहे. हा समन्वयाचा काळ येण्यास महाराष्ट्रांतील फार मोठया ज्योतिर्विदांचे परिश्रम कारणीभूत झाले आहेत. केरोपंत छत्रे, शंकर बाळकृष्ण दीक्षित, व्यं. बा. केतकर, के. ल. दप्तरी इत्यादि मोठमोठ्या पंडितांचे परिश्रम या समन्वयास कारण झाले आहेत. दप्तरींच्या दोन पिढ्या व केतकरांच्या तीन पिढ्या ज्योतिर्विदांच्या झालेल्या दिसतात.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर इ. स. १९५२ मध्यें केन्द्र सरकारनें पंचांग-सुधारणा समिति नेमली. त्या समितीनें जे निर्णय केले त्यांच्या अनुसारानें राष्ट्रीय पंचांग निघण्यास सुरवात झाली आहे. हें अखिल भारतीय राज्यमान्य पंचांग प्रत्येक प्रादेशिक भाषेंत निघूं लागलें आहे. त्याला लोकमान्यता प्राप्त व्हावी म्हणून प्रत्येक प्रांतांतील ज्योतिर्विदांनी प्रसाराचें कार्य केलें पाहिजे. या बाबतींत व्हावी तशी प्रगति होत नाहीं याचें एक महत्त्वाचें कारण सरकारी दप्तराची दिरंगाई होय. राज्यमान्य पंचांग बाजारांत वर्षारंभापूर्वी एक महिनाभर तरी उपलब्ध व्हावयास पाहिजे.

## विज्ञानाच्या इतिहासांतील पहिलें शास्त्र

ज्योतिषशास्त्राची उत्पत्ति माणसाच्या अत्यंत मूलभूत अशा कालज्ञानाच्या गरजेंतून झालेली आहे. सर्व मानवी कर्में किंवा कर्तव्यें हीं योग्य कालीं घडलीं तरच योग्य फलदायी होतात. विशिष्ट काल व विशिष्ट कर्म यांचा संबंध अविभाज्य आहे म्हणून माणूस काळाचें रूप सांगोपांग समजण्याचा प्रथमपासून प्रयत्न करूं लागला. त्याच्याकरितां आकाशांतील प्रकाशपुंजांचें ज्ञान आवश्यक साधन म्हणून मानवास उपयोगी पडूं लागलें. कालाचें मोजमाप करण्याचें मुख्य साधन म्हणजे आकाशांतील ज्योतींची स्थितिगति होय. या स्थितिगतींचें ज्ञान सूक्ष्म तऱ्हेनें होण्याकरता कालाचे सूक्ष्मच्छेद पाडून माणूस मोजूं लागला. हें मोजमाप म्हणजेच अंकगणित होय. ज्योतिषशास्त्र व गणित हीं जुळीं भावंडें होत.

शास्त्रांच्या किंवा विज्ञानाच्या इतिहासांतील पहिलें शास्त्र किंवा आद्य शास्त्र ज्योतिषशास्त्र होय. ज्योतिषशास्त्र हें विविध विज्ञानांमध्यें पहिल्यांदा जन्माला आलेलें म्हणजे विज्ञानांचा ज्येष्ठ सहोदर होय. या सहोदराच्या पाठीमागून लगेच जन्मलेला बंधु म्हणजे गणित होय. गणित हें सर्व विज्ञानांचें अधिष्ठानभूत शास्त्र आहे.

प्राचीन भारतांतील ज्योतिषाची व गणिताची वाढ एकमेकांना उपकारक अशी झाली आहे. भारतीय ज्योतिर्वेत्त्यांतील सर्वश्रेष्ठ शिरोमणि भास्कराचार्य यांनीं ज्योतिर्विद्या आणि गणितविद्या ह्या एकाच सिद्धान्त-शिरोमणि या ग्रंथांत गोवल्या आहेत; हें या दोन शास्त्रांच्या उत्पत्तीचे व विकासाचे परस्परसंबंध कसे आहेत याचें सूचक होय. ज्योतिषशास्त्राचे साधारणपणें ज्योतिर्विषयक गणितशास्त्र व ज्योतिर्विषयक अवलोकन करून निष्पन्न झालेले खगोलविषयक विचार असे दोन भाग होत. ज्योतिर्गणित अवलोकनावर आधारलेलें आहे. अर्वाचीन काळीं खस्थ ज्योतींचें ज्ञान करून देणारी अत्यंत प्रभावी अशी यंत्रसामग्री तयार करण्यांत आली आहे. ही यंत्रसामग्री हळूंहळूं प्रगत होत गेली आहे. ती प्राचीन काळीं उपलब्ध नव्हती.

## दृक्प्रत्ययावरून अनुमानें

केवळ दृक्प्रत्ययाचा उपयोग करून प्राचीन काळीं ज्योतिर्विषयक अनुमानें केलीं जात. अशा अनुमानांनीच

* मुंबई येथें दि. २५ ते २७ नोव्हेंबर १९६१ या दिवशीं भरलेल्या महाराष्ट्र राज्य ज्योतिष परिषदेच्या अध्यक्षीय भाषणांतील महत्त्वाचा भाग.








प्राचीनांनी आपलें शास्त्र सजविलें आहे. प्राचीन संशोधकांनीं दृक्-प्रत्ययास साधनीभूत अशीं प्राथमिक अवस्थेंतील यंत्रें निर्मिण्यास सुरुवात केली. प्राचीन संशोधक ग्रहवेधांकरितां यंत्रांचा उपयोग करूं लागले. तुरीययंत्र, गोलयंत्र, चक्र यंत्र, नाडीवलय, घटिका, शंकु, फलक, चाप, यष्टियंत्र, अशीं मुख्यतः नऊ यंत्रें भास्कराचार्यांनीं यंत्राध्यायांत वर्णिलीं आहेत. चक्रयंत्र, चाप व तुरीययंत्र यांचा मुख्यतः वेधाकडे उपयोग आहे. गोलयंत्रावरून ब्रह्माण्ड गोलाची रचना कळून येते. ब्रह्मगुप्त, लल्ल व आर्यभट यांनीं गोलबंध सांगितले आहेत. रविचंद्रांचें अंतर व त्यावरून तिथि काढण्यास उपयोगी पडणारीं साधनें ब्रह्मगुप्तानें व लल्लानें सांगितलीं आहेत. पंचसिद्धान्तिकेंत वराहमिहिरानेंहि यंत्राचे प्रकार वर्णिले आहेत. प्राचीन काळीं ज्योतिर्निरीक्षण करण्याकरतां निरनिराळे राजेरजवाडे यांच्या आश्रयाखालीं ठिकठिकाणीं वेधशाळा बांधिल्या जात होत्या. जयसिंहानें बांधलेल्या दिल्ली, जयपूर, मथुरा, काशी, उज्जयिनी, येथल्या वेधशाळांची माहिती त्याने स्वतःच्या ग्रंथांत दिली आहे. यांपैकीं चार वेधशाळांचें वर्णन हंटरनें इ. स. १७९९ मध्यें समक्ष पाहून 'एशियाटिक रिसर्चेस'मध्यें केलें आहे. काशी येथील वेधशाळेचें वर्णन पं. बापुदेवशास्त्री यांनीं 'मानमंदिरस्थ यंत्रवर्णन' या लेखांत दिलें आहे.

## प्रत्यक्ष, अनुमान व शास्त्र

प्रत्यक्ष, अनुमान व शास्त्रग्रंथ या तिघांचीहि शास्त्रवाढीस सारखीच मदत होत असते. प्रत्यक्ष हें प्रमाण एका अर्थानें सर्वश्रेष्ठ प्रमाण होय. भारतीय तर्कशास्त्रांत प्रत्यक्ष हें सर्व प्रमाणांत प्रबल प्रमाण म्हणून मान्य केलें आहे. श्री आद्य शंकराचार्य सुद्धां प्रत्यक्ष व श्रुति यांचा विरोध आला तर प्रत्यक्षच प्रमाण ठरतें, श्रुति नव्हे असें आग्रहानें प्रतिपादितात. 'नहि श्रुतिशतमपि अग्निः शीतः इति ब्रुवत् प्रामाण्यं उपैति' अग्नि थंड आहे असें शंभर श्रुति वचनांनीं म्हटलें तरी तें प्रमाण ठरत नाहीं, असें त्यांनीं म्हटलें आहे. भारतीय प्रमाणविद्येचा व पूर्वमीमांसेचा असा सिद्धान्त आहे कीं, प्रत्यक्ष व अनुमान म्हणजे तर्क यांनीं बाधित जें होत नसेल तेंच श्रुतीचें प्रतिपाद्य होय व तेंच श्रुति-प्रतिपादन प्रमाण होय. हा दृष्टिकोण विशेषतः इंद्रियगम्य अशा भौतिक सृष्टीच्या नियमांचें ग्रथन करणाऱ्या ज्योतिषशास्त्रास अधिक लागू आहे. प्रत्यक्ष प्रयोग व तर्क यांचाच हा विषय होय. प्रत्यक्षानें व तर्कानें सिद्ध झालेले नियमच गणित-ज्योतिषशास्त्रांचा विषय होय. या शास्त्रांत शब्दप्रामाण्य हें महत्त्वाचें नव्हे, तें दुय्यम होय. **भारतीय ज्योतिषशास्त्राची प्रगति अनेक शतकें खुंटली याचें कारण प्रत्यक्ष संशोधन करण्याची प्रवृत्ति मंदावली हें होय.** भारतीयांनी गणित, ज्योतिष, वैद्यक इत्यादि विद्यांच्या रूपानें प्राचीन काळीं जगाला फार मोठी देणगी दिली आहे. परंतु तो प्रगतीचा वेग सतत टिकला नाहीं याचें कारण ग्रंथप्रामाण्याला किंवा शब्दप्रामाण्याला वाजवीपेक्षां जास्त महत्त्व दिलें गेलें हें होय. प्रत्यक्ष वेध घेऊन शोध करीत बसण्यापेक्षां प्राचीन ग्रंथांवर टीका व उपटीका लिहिण्यांतच फार मोठे परिश्रम करण्यांत पंडितांनीं आपला काळ घालविला आहे. भास्कराचार्यांच्या ग्रंथांवर झालेल्या ३०/३५ टीकाग्रंथांची नोंद सांपडते. जुन्या ग्रंथकारांनीं शोधलेल्या सिद्धान्ताच्यापुढें अधिक शोधण्याची प्रवृत्ति म्हणजे जुन्याच्या पुढें जाण्याची प्रवृत्ति प्रकटपणें व उत्कटपणें प्राचीन विद्वानांत फार थोड्यांच्या ठिकाणीं आढळते. आपल्या पूर्वीचा प्राचीन थोर ग्रंथकार चुकूं शकतो अशी कल्पना ज्या पंडितांच्या ठिकाणीं होती त्यांनींच शास्त्रांत भर घातली आहे.

## आर्यभटापासून भास्कराचार्यांपर्यंत भरभराट

पहिल्या आर्यभटापासून (इ. स. ५००) तो भास्कराचार्यां-(इ. स. ११५०) पर्यंतचा काळ भारतीय ज्योतिषशास्त्राचा पूर्ण भरभराटीचा काळ होय. या काळांत जी प्रगति झाली त्याचें कारण स्वबुद्धीनें आणि वेध घेऊन शोध लावावे व सारासार विचार करून पूर्वसूरींचे ग्राह्य विचार कोणते व अग्राह्य विचार कोणते याबद्दल स्पष्ट व निर्भीड विचार मांडावे असा दृष्टिकोन पंडितांनीं स्वीकारला होता. पृथ्वी प्रत्यहीं आपल्या आंसाभोंवतीं फिरते असें म्हणणारा भारतांतील पहिला ज्योतिषी आर्यभट होय. आर्यभटानें भगणादिमानांत नक्षत्र परिवर्तन न सांगतां भू-भ्रम सांगितले आहेत. आर्यभटानंतर सुमारे सव्वाशे वर्षांनीं छिद्रान्वेषणपटु ब्रह्मगुप्तानें अनेक स्वतंत्र शोध ग्रथित करणारा ब्रह्मसिद्धान्त लिहिला. ब्रह्मसिद्धान्ताच्या कुट्टक-












नामक अध्यायांत बीजगणितांतील बरेच विषय आले असून पहिला बीजगणितकार तोच असावा असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु हा नवीन विषय मी मांडला असें तो कोठेंच म्हणत नाहीं, ह्यावरून बीजगणित त्यापूर्वीच वाढीस लागलें होतें अशी कल्पना करतां येते. ब्रह्मगुप्तानें 'खंडखाद्य' हा करणग्रंथ आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षी रचिला. त्याच्या स्वतःच्या सिद्धान्ताची संक्रांति सूर्यसिद्धान्ताच्या व आर्यभटाच्या पूर्वी एक दिवस येत होती. व अधिक मासहि ह्या दोन सिद्धान्ताहून भिन्न येत असे. म्हणून ब्रह्मगुप्ताच्या सुधारलेल्या शास्त्राला लोकमताचा विरोध झाला. गतांनुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः या म्हणीचा प्रत्यय शास्त्रप्रगतीच्या आड येणाऱ्या लोकमतावरून येतो. लोकमताच्या अशा व्यत्ययाला रूढीचे दास असलेले पंडितहि मदत करितात. आपल्या वयाचीं ६७ वर्षें गेलीं तरी आपले अनुयायी कोणी होत नाहींत असें पाहून शेवटीं निराश होऊन ब्रह्मगुप्तानें आर्यभटाच्या करणग्रंथाशीं जुळणारा करणग्रंथ केला. ब्रह्मगुप्ताच्या सिद्धान्ताची त्याच्या हयातींत चहा झाली नाहीं तरी पुढें भास्कराचार्यांसारख्या ज्योतिषानें त्याच्याच आगमाचा स्वीकार केला, एवढेंच नव्हे तर इ. सनाच्या आठव्या शतकांत ब्रह्मगुप्ताच्या सिद्धांत व खंडखाद्य या ग्रंथांचीं सिंधिदम् आणि अलअर्कंद नांवाचीं अरबी भाषांतरें झालीं. अल्बेरुणीच्या इंडिका ग्रंथाच्या आधारें प्रा. साचो म्हणतो कीं, प्राच्य देशांतील शास्त्रप्रगतीच्या इतिहासांत ब्रह्मगुप्ताला महत्त्वाचें स्थान आहे. अरब लोकांना टॉलेमीच्या ग्रंथाची माहिती होण्यापूर्वी ज्योतिषशास्त्र ब्रह्मगुप्तानें शिकविलें.

## वराहमिहिराचें अनन्य स्थान

भारतीय ज्योतिषशास्त्राच्या इतिहासांत वराहमिहिर या पंडिताचें अनन्यसाधारण महत्त्व आहे. शके ४१२ (इ. स. ४९०) हा त्याचा जन्मशक मानतात. हा जन्मशक मानल्यास वराहमिहिर अत्यंत दीर्घजीवी म्हणजे ९७ वर्षें जगला असें म्हणावें लागतें. कारण ब्रह्मगुप्त टीकाकार पृथुस्वामी व आमराज यांनीं शके ५०९ (इ. स. ५८७) हा त्याचा मृत्युकाल दिला आहे. भारतीय ज्योतिषशास्त्राचें पहिलें समग्र संकलन वराहमिहिराच्या पंचसिद्धान्तिका या ग्रंथांत सांपडतें. पंचसिद्धान्तिकेंतील उल्लेखांशिवाय शके ४२० पूर्वीचे ज्योतिष ग्रंथकार समजण्यास महत्त्वाचें साधन दुसरें नाहीं. सूर्यसिद्धान्त, सोमसिद्धान्त, वसिष्ठसिद्धान्त, रोमकसिद्धान्त, आणि शाकल्योक्त ब्रह्मसिद्धान्त यांपैकीं सोमसिद्धान्ताखेरीज बाकीचे सिद्धान्त पंचसिद्धान्तिकेंत आले आहेत. **भारतांत प्राचीन शास्त्रप्रगतीच्या युगांत जगांतील दूरदूरच्या संस्कृतींतील शास्त्रीय ज्ञानांचा अन्योन्यविनिमय किंवा आदानप्रदान होत होतें ही गोष्ट रोमकसिद्धान्त, पुलिशसिद्धान्त या दोन संज्ञांवरून अनुमानितां येते.** रोमकसिद्धान्त खिस्तपूर्व दीडशेंच्या सुमारास होऊन गेलेल्या हिप्पारकस नामक ग्रीक ज्योतिषाच्या ग्रंथास अनुसरून केला असावा असें तज्ज्ञांचें अनुमान आहे. पुलिश सिद्धान्ताच्या बाबतींत अल्बेरुणी म्हणतो कीं, हा सिद्धान्त पौलस ग्रीक यानें रचला व त्याच्यावरून हिंदूंनीं संस्कृत ग्रंथ केला. अल्बेरुणीच्या म्हणण्याची सत्यासत्यता ठरविण्यास प्रत्यक्ष प्रमाण मिळत नाहीं. वराहमिहिराच्या संबंधीं असें म्हटलें जातें कीं, त्यानें यवन देशांत जाऊन ज्योतिषशास्त्र संपादिलें. ही समजूत उत्पन्न होण्यास एक कारण असें झालें असावें कीं, वराहमिहिरानें असें म्हटलें आहे कीं, यवनांच्यामध्यें हें शास्त्र प्रतिष्ठा पावलें आहे म्हणून तेहि ऋषिवत् पूज्य होत. वराहमिहिराचा बृहत् संहिता हा ग्रंथ विशिष्ट प्रकारचा ज्ञानकोशच होय. फलज्योतिष, नानाप्रकारचे सृष्टिचमत्कार, प्राणिलक्षणविद्या, वास्तुविद्या, वृक्षायुर्वेद, प्रतिमाकरण, रत्नपरीक्षा, धातुविज्ञान, पदार्थांचे गुणधर्म व त्यांचे उपयोग यासंबंधीं पुष्कळ माहिती बृहत्-संहितेंत मिळते. वराहमिहिराच्या बृहत्-संहितेंत जी सृष्टपदार्थांच्या ज्ञानाबद्दल आस्था व्यक्त झालेली दिसते ती तशीच त्याच दिशेनें पुढें अव्याहत टिकली असती तर भारतांतहि विज्ञानाची वाढ पाश्चात्य देशांप्रमाणेंच होऊं शकली असती.

## भास्कराचार्यांचे शोध

प्राचीन भारतांतील सर्वश्रेष्ठ ज्योतिषी म्हणजे भास्कराचार्य होत. इष्टदिक् छायासाधन व पातसाधन या दोन गोष्टीसंबंधीं भास्कराचार्यांच्या ग्रंथांत नवीन माहिती आली आहे. शरासंबंधीची पूर्वीच्या ग्रंथकारांची चुकीची समजूत खोडून तो क्रांतिवृत्तावर








लांब असतो असें त्यांनीं स्पष्ट दाखवून दिलें आहे. उदयान्तर हा एक त्यांचा नवीन शोध आहे. इष्टकालीं मध्यमरवि व स्पष्टरवि यामध्यें जें अंतर म्हणजे भुजांतर नामक फलसंस्कार, त्यामानानें स्पष्टोदय मागेपुढें होतो; हा संस्कार पूर्व ग्रंथकारांनीं सांगितला आहे. परंतु पृथ्वी आंसाभोंवती फिरते ती विषुववृत्तांत फिरते, क्रांतिवृत्तांत फिरत नाहीं, यामुळें क्रांतिवृत्ताचे तीस अंश क्षितिजावर येण्यास जो वेळ लागतो तितकाच नेहमी विषुववृत्ताचे तीस अंश येण्यास लागतो असें नाहीं. यासंबंधीच्या संस्कारास 'उदयान्तर' नांव भास्कराचार्यांनीं दिलें आहे.

भास्कराचार्यांनंतर या शास्त्रांत महत्त्वाची भर कोणीहि भारतीयानें टाकली नाहीं. आर्यभटापासून भास्कराचार्यांपर्यंतच्या काळांत जी शास्त्रप्रगति झाली तिचें ऋण पाश्चात्य शास्त्रज्ञांस मान्य झालें आहे. हिंदूंच्या ग्रंथांचीं अरबींत व लॅटिन भाषेमध्यें भाषांतरें झालीं आणि अरब लोक व ग्रीक लोक ज्योतिषांत हिंदूंचे शिष्य झाले ते याच कालामध्यें. याच काळामध्यें अयनगतीचाहि पूर्ण विचार झाला. ही झाली प्राचीन इतिहासाची कथा! आतां त्याच्या उलट झालें आहे. भारतानें पाश्चात्यांचे शिष्य बनण्याचा हा काळ आहे. उत्तम शिष्य बनल्याशिवाय गुरु होतां येत नाहीं; उत्तम शिष्यच उत्तम गुरु बनतो.

## फलज्योतिष

भारतीय ज्योतिषाच्या सिद्धान्त, संहिता व होरा अशा तीन शाखा होत. सिद्धान्त म्हणजे ग्रहादि ज्योतींच्या खगोलांतील गतींचें गणितसिद्ध ज्ञान होय. संहितेंत उल्कापात, भूकंप, अतिवृष्टि, अनावृष्टि इत्यादि विश्वांतील घटनांचा व ग्रहादितारकांच्या गतिस्थितीचा संबंध संहितेंत प्रतिपादिलेला असतो. इतरहि सृष्टिज्ञान व शुभाशुभांची माहिती संहितेंत असते. संहिता म्हणजे विविध माहितीचा संग्रह होय. होरा म्हणजे फलज्योतिष वा जातक नामक ज्योतिष होय. लोकप्रीतीस पात्र व चिकित्सकांच्या निंदेस प्राचीन कालापासून कारण असलेली ज्योतिषाची शाखा म्हणजे फलज्योतिष होय. गणितज्योतिष ऋग्वेदाइतकेंच प्राचीन आहे. आकाशस्थ ज्योतींचें परिज्ञान करून घेण्याची इच्छा ऋग्वेदांत प्रतिबिंबित झाली आहे. ऋग्वेदांत दिवस, मास, १२ महिन्यांचा संवत्सर, अधिकमास, इत्यादि सौर व चान्द्र कालमानें मिळतात. पृथ्वी ही गोल व अधांतरी आहे व सूर्यापेक्षां पृथ्वी लहान आहे, सूर्य विश्वाचें केंद्र (आत्मा) आहे, अशी कल्पना ऋग्वेदिक आर्यांना आली होती. परंतु ऋग्वेदांत फलज्योतिषाचें गमक निश्चितपणें सांपडत नाहीं. फलज्योतिषाचें निश्चित गमक अथर्ववेद संहितेत मिळतें. माणसांच्या सुखदुःखाशीं नक्षत्रांचा व ग्रहांचा निकटचा संबंध आहे, किंबहुना माणसाच्या भाग्याचें व दौर्भाग्याचें कारकत्व नक्षत्रांकडे आहे, निदान त्यांचा माणसाच्या जीवनावर शुभाशुभ परिणाम होतो, अशी निश्चित समजूत अथर्ववेदकालीं होती. 'अष्टाविंशानि शिवानि शग्मानि सह योगं भजन्तु मे' अभिजित् सह अठ्ठावीस नक्षत्रें मला सुयोग प्राप्त करून देवोत, अशी प्रार्थना अथर्ववेदांत आली आहे (१९-८-२). पुण्यनक्षत्र व पापनक्षत्र अशी विभागणी अथर्ववेदकालीं झाली होती असें निश्चित अनुमान करतां येतें.

> शं नो ग्रहाश्चांद्रमसाः शमादित्यश्च राहुणा ।
> शं नो मृत्युर्धूमकेतुः शं रुद्रास्तिग्मतेजसः ॥

चंद्रासह सर्व ग्रह, राहूसह आदित्य, साक्षात् मृत्यु असलेला धूमकेतु, आणि तीक्ष्ण तेजाचे रुद्र आमचें कल्याण करोत, अशी प्रार्थना (१९-९-१०) आणि शं नो दिविचरा ग्रहाः (१९-९-७) अशी प्रार्थना केलेली अथर्ववेदांत आहे. ज्येष्ठा नक्षत्राचा ज्येष्ठघ्नी असा आणि मूलनक्षत्राचा मूलबर्हण असा निर्देश करून प्रार्थना केली आहे कीं, ज्येष्ठा किंवा मूळ नक्षत्रावर झालेल्या या मुलाचें सर्व बाजूनें हे अग्ने रक्षण कर. पापनक्षत्रावर उत्पन्न झालेला हा मुलगा व्याघ्र दिवशीं म्हणजे क्रूर दिवशीं जन्मलेला असल्यामुळें तो वाढीस लागला असतां पित्याचा वा जननीचा नाश न होवो अशी अग्नीची प्रार्थना अथर्ववेदांतील एका सूक्तांत (६-१-१०) केलेली आहे. ज्येष्ठानक्षत्रावरचा जन्म ज्येष्ठ बंधूचा नाश करतो किंवा सर्वच ज्येष्ठांचा नाश करतो व मूळ नक्षत्रावरचा जन्म सर्व कुळ नष्ट करतो; अशा प्रकारच्या कल्पना जातक ज्योतिषांतील मूलभूत कल्पना होत, त्या अथर्ववेदांत सांगितल्या आहेत.







## ग्रह व राशी यांचे इतिहासांतील उल्लेख

प्राचीन भारतीय इतिहासांत कलेच्या क्षेत्रांत जातक ज्योतिष याचें प्रतिबिंब इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या सुमारास आढळतें. नागार्जुनकोंडा येथील एका मूर्तिशिल्पांत बुद्धपिता शुद्धोदन याच्या समवेत ज्योतिषी व भविष्यवादी भोजनप्रसंगीं भविष्यनिवेदन करतांना दिसतात. ते आपल्या दोन अंगुली निर्दिष्ट करून असें सुचवितात कीं, नवीन जन्माला आलेला मुलगा सिद्धार्थ एक तर साक्षात्कारी महापुरुष तरी होईल किंवा विश्वसम्राट तरी होईल. हाच सिद्धार्थ बुद्ध म्हणून पुढें प्रसिद्धीस आला. या मूर्तीच्या पायापाशीं एक लेखक म्हणजे कारकून राजपुत्र सिद्धार्थाची तालपत्रावर जन्मकुंडली काढीत बसलेला आहे. रामाच्याहि जन्माच्या वेळीं ग्रहपंचक उच्चस्थ होतें असा रामायणांत निर्देश आहे. नागार्जुनकोंडा येथील एका मूर्तिशिल्पांत असें दाखविलें आहे कीं, आईशेजारीं नुकतें जन्माला आलेलें मूल आहे आणि ग्रहांच्या मेळाव्यासह गणेश आणि शिव हे तेथें उपस्थित आहेत. या चित्रणाच्या मूळाशीं अशी समजूत होती कीं, गणेश सुखप्रसूतीस कारण होतो आणि शिव प्रसूतीनंतर रक्षण करतो. वराहमिहिराच्या बृहत् संहितेंत मूर्तिशिल्पाचें विवरण आलें आहे. त्यांत रवीचा वेष उत्तरेकडचा म्हणजे पायांत कुशानीबूट, अंगांत भारीकोट व डोक्यावर पागोटें असा असावा असें म्हटलें आहे. गुप्तकालामध्यें मूर्तिकलेवर वराहमिहिराच्या बृहत्-संहितेचा प्रभाव दिसून येतो. कुशान व गुप्तकाळापूर्वीच्या सूर्यमूर्तीची घडण पाहतां त्यांत बूट व कोट नाहीं, नुसतें पागोटें आहे. भाजे, बुद्धगया आणि मथुरा येथील मूर्तिशिल्पांत असा सूर्य सांपडतो. ग्वाल्हेर येथील प्राचीन वस्तुसंग्रहालयांत गुप्तकालांतील कोरलेले पाषाण किंवा स्तंभ ठेवलेले आहेत. त्यांत राशि व ग्रह यांच्या मूर्ति कोरलेले स्तंभ आहेत. एका स्तंभावर केतु वगळून बाकीचे अष्टग्रह कोरले आहेत. अष्टग्रहाचें कोरीव काम साधारणपणें नवग्रहशिल्पाच्या पूर्वकालचें मानतात. उत्तर भारतांतील गुप्तकलेचें कांहीं अंशीं अनुकरण व कांहीं अंशीं परिवर्तन करून दक्षिणेंतील चोलकालीन मंदिरांतील ग्रहमाला कलाकारांनी निर्मिली आहे. उत्तर भारतांतील गुप्तकालीन राहु हा चंद्रसूर्यांना गिळणारा भयंकर राक्षस म्हणून चित्रित केलेला असून सर्व ग्रहांना चार हात दाखविले आहेत. दक्षिणेंतील राहूसह सर्व ग्रह द्विबाहु, तरुण व सुंदर दाखविले आहेत. गुप्तकालानंतर काकतियांचा काल येतो. त्यांत बारा राशी व नवग्रह यांचें मूर्तिशिल्प अनुकरण व परिवर्तन या दोन्ही प्रकारच्या क्रियांनी साधलेलें सांपडतें. त्यांत सूर्य कमलाकार दाखविला असून बारा राशि त्या कमला भोंवती वर्तुळांत दाखविल्या आहेत. चालुक्य, होयसळ व चोल यांच्या मंदिरस्थापत्यांत चित्रशिल्पाचे जे उत्कृष्ट नमुने आहेत त्यांतहि राशि, दिक्पाल, नवग्रह, विराट्पुरुष, रोहिणी सारखीं नक्षत्रें व एकंदरींत आकाशमहापट यांचीं चित्रणें सांपडतात. राजस्थानांत तिथि, मुहूर्त, मास, वर्ष, नक्षत्र यांचींहि कल्पित व्यक्तिरूप चित्रें मूर्तिशिल्पांत कोरलेलीं सांपडतात. या प्रकारच्या मूर्तिशिल्पाचें विधान करणारे ग्रंथ तंजावर येथील मराठा राजवटींत निर्मिलेल्या सरस्वती महाल ग्रंथालयांत सुरक्षितपणें ठेवलेले आजहि मिळतात.

## फलज्योतिषाचा उगम

फलज्योतिष हें मुळांत बाबिलोनमध्यें म्हणजे असीरियन संस्कृतीमध्यें वाढीस लागलें व त्याचा स्वीकार पाठीमागून ग्रीस, भारत, चीन इत्यादि राष्ट्रांत झाला असें कांहीं इतिहासकार म्हणतात. भारतांत वराहमिहिराच्या काळीं यवनजातक प्रसिद्ध होतें. वराहमिहिर यवनाचार्यांचा उल्लेख करतो. बृहत् जातकावरील टीकाकार भटोत्पल यानें स्फुजीध्वज नांवाच्या यवनेश्वर जातकशास्त्रकर्त्याचा उल्लेख केला आहे. यावरून असें मात्र अनुमान करूं नये कीं, फलज्योतिष अथवा जातकविद्या ही ग्रीक लोकांकडून भारताला मिळाली. वराहमिहिरानें यवनाबरोबरच गर्ग, पराशर, असित, देवल, वृद्धगर्ग, कश्यप, भृगु, वशिष्ठ, बृहस्पति, मनु, मय, सारस्वत, ऋषिपुत्र इत्यादि पूर्वऋषींचा उल्लेख केला आहे. वराहमिहिरानें ऋषींच्या बरोबर सत्य, मय, यवन, मणित्थ, जीवशर्मा, विष्णुगुप्त इत्यादि पूर्व आचार्यांचा उल्लेख केला आहे. वराहमिहिराच्या बृहद् जातकावरील टीकाकार भटोत्पल यानेहि गार्गी, बादरायण, याज्ञवल्क्य, मांडव्य, या वराहमिहिरपूर्व आचार्यांचा निर्देश केला आहे. वराहमिहिरानें उल्लेखिलेला विष्णुगुप्त म्हणजे चाणक्य होय असें उत्पलानें म्हटलें आहे.








## फलज्योतिषाचें यथार्थत्व

हा चाणक्य म्हणजे जर कौटिल्य मानला तर त्याचा शुभाशुभ मुहूर्तावर फारसा विश्वास नव्हता असें कौटिलीय अर्थशास्त्रावरून दिसतें. तो म्हणतो " नक्षत्रमतिपृच्छन्तं बालमर्थोऽतिवर्तते । अर्थो ह्यर्थस्य नक्षत्रं किं करिष्यन्ति तारकाः " ( अर्थशास्त्र २६-१२५ ). " नक्षत्राची फार चवकशी करणाऱ्या मूर्खापासून अर्थसिद्धि दूर पळत असते. अर्थ ( भांडवल ) हाच अर्थाचें नक्षत्र होय. तारका ( बिचाऱ्या ) काय करणार ? " कौटिल्याचा हा विचार गृहीत धरला तरी जातकशास्त्र त्यानें लिहिलें नाहीं असें म्हणतां येत नाहीं. कारण तो परंपरागत समजुती व परंपरागत विद्या यांची काळजीने नोंद करणारा होता. मंगलतिथि किंवा मंगलनक्षत्र, आपत्तीचा प्रतिकार करणाऱ्या शांति यांचा निर्देश त्यानें अर्थशास्त्रांत केला आहे. राजाला पारलौकिक कर्माचें अनुष्ठान त्याने सांगितलें आहे. फलज्योतिषावर फाजील विश्वास ठेवूं नये एवढेंच त्याचें म्हणणें दिसतें. कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांनाहि फलज्योतिषाच्या यथार्थत्वाबद्दल फार शंका होती. परंतु बाबाजी काशीनाथ पटवर्धन महाडकर नामक एका ज्योतिष्यानें त्यांना फलज्योतिषाच्या खरेपणाचा प्रत्यक्ष प्रत्यय दिला त्यामुळे त्यांत कांहीं तथ्य असावें असें त्यांना वाटूं लागलें. पटवर्धन महाडकर हे शरीरलक्षणावरून जन्मकुंडली मांडत व ती बरोबर पटत असे असें दीक्षितांनीं लिहून ठेवलें आहे. या पटवर्धन महाडकर ज्योतिष्यानें महाराष्ट्रांतील महान् सुधारक व नास्तिक गो. ग. आगरकर यांनाहि आपल्या ज्योतिषानें विस्मित केले होतें असें आगरकरांच्या ' सुधारक ' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेल्या मजकुरावरून दिसून येतें.

## संशोधनाची कसोटी लावा

मुहूर्तशास्त्रासह फलज्योतिषाचे व इतर सामुद्रिकासारख्या लक्षणशास्त्राचे पुष्कळ ग्रंथ आज उपलब्ध आहेत. पाराशरी, जैमिनीसूत्र, भृगुसंहिता हे आर्षग्रंथ किती प्राचीन आहेत याची शंका आहे. परंतु वराहमिहिराचे बृहत्जातक व बृहत्संहिता उपलब्ध पौरुषेय ग्रंथांतील प्राचीनतम ग्रंथ होत, यांत शंका नाहीं. रमल व ताजिक याहि होरास्कंधाच्या शाखा उपलब्ध होतात. त्या सर्वांचें व्यवस्थित आलोडन करून दृक्‌प्रत्ययाच्या दृष्टीनें संशोधन केलें पाहिजे. तसें केलें तरच फलज्योतिष, मुहूर्तज्योतिष किंवा होरास्कंध, ही विद्या बुद्धिवाद्यांच्या बौद्धिक आघातापासून सुरक्षित राहूं शकेल. अर्थात् तें संशोधनाच्या कसोटीस उतरलें तरच टिकेल. जितका शिक्षणाचा प्रसार अधिक होत जाईल व लोक दैववाद सोडून उद्योगवादी होत जातील तितकीं राशिभविष्यें सांगणारीं वृत्तपत्रें, मासिकें व भविष्य वर्तविणारीं वार्षिकें यांना उतरती कळा येत जाईल. सध्यांच्या वृत्तपत्रांतील राशिभविष्यें हा होरास्कंधाचा दुरुपयोगच म्हटला पाहिजे. आज वैज्ञानिक कसोटीला जातकविद्या व लक्षणविद्या उतरेल अशी परिस्थिति नाहीं. तो एक उपजीविकेचा धंदा म्हणूनच चालवणारे लोक आणि दैववादी जनता यांच्या सहकार्यामुळेंच या विद्यांची आज चलती आहे. या विद्येसंबंधीं संख्याशास्त्रानें युक्त सूक्ष्मरीत्या तपासलेलीं निरीक्षणें करणाऱ्या, त्या निरीक्षणांची पद्धतशीर नोंद ठेवणाऱ्या व उपजीविकेच्या धंद्याशी किंचितहि संबंध न ठेवणाऱ्या अशा ज्योतिषसंस्था स्थापन करून त्या चालविल्या पाहिजेत.

## कालमापनाचीं साधनें

जातकाची संख्याशास्त्रीय अनुभवनिष्ठ कसोटी उपलब्ध करून देणारी अद्ययावत् साधनसामग्री आज मोठ्या प्रमाणांत मिळूं शकते. नगरपालिका व ग्रामपंचायती यांच्यांत जन्ममृत्यूच्या नोंदी मोठ्या प्रमाणांत होऊं लागल्या आहेत. प्रसूतिगृहें व रुग्णालयें यांचा मोठ्या प्रमाणांत विस्तार होत आहे. प्रसूतिगृहांत हजारों बालकें रोज जन्माला येत आहेत. सूक्ष्म कालाची नोंद करण्यास अनुकूल अशीं कालज्ञापक रेडिओसारखीं साधनें खेड्यापाड्यापर्यंत पसरूं लागलीं आहेत. त्यामुळें सूक्ष्म कालमापन करून योग्य व शास्त्रशुद्ध जन्मकुंडली तयार करण्यास पूर्वीसारख्या अडचणी राहिल्या नाहींत. जन्मटिप्पण ठीक नाही, म्हणून भविष्य चुकतें; अशी तक्रार करण्यास आतां अवसर राहिला नाहीं. पन्नास साठ वर्षांपूर्वी खेड्यापाड्यांत जन्मलेल्या स्त्रीपुरुष व्यक्तींच्या जन्मकालांची नोंद बरोबर आहे कीं नाहीं याबद्दल शंका घेण्यास पुष्कळच अवसर होता. घड्याळें क्वचित असावयाचीं; असलीं तरी तीं बरोबर लावलेलीं नसायचीं; बरोबर लावलेलीं असलीं तरी प्रसूतीच्या








वेळीं त्यांचा कालमानज्ञानास उपयोग करणाऱ्या व्यक्ति थोडया असायच्या; जन्मकालाची नोंद करतांना हयगय व दिरंगाई व्हावयाची; पंचांग किंवा दैनंदिनी फार थोडयांच्या जवळ असायची; असली तरी ती नीट पाहिली जायची नाहीं. अशा प्रकारच्या अडचणी आतां राहिल्या नाहींत. स्वीत्झर्लंडचीं घडयाळें रेल्वेपासून व शहरापासून शंभर दोनशें मैलावरील दोन हजार वस्तीच्या खेडयांतहि दहा-पांच लोकांच्या मनगटावर चमकत असलेलीं आतां दिसतात. रेडिओहि दिवसा व रात्रीं न्यूयॉर्क, लंडन, मास्को व पेकिंग येथील बातम्या व कालमान ओरडून सांगतांना ऐकूं येतो. म्हणून मूळ नक्षत्र, ज्येष्ठा नक्षत्र, संक्रांति, व्यतिपात इत्यादिकांवर जन्माला आलेल्या अपत्यांच्या योगानें काय काय आपत्ति कुटुंबावर येतात यासंबंधीं निरंतर निरीक्षण करीत राहणें व त्याची सतत नोंद करीत राहणें आतां फार शक्य झालें आहे. दर महिन्यास मूळ, ज्येष्ठा, व्यतिपात, संक्रांति वगैरे योग येतातच. त्या योगांवर लक्षावधि बालकें जन्मतात. त्यांचीं फलितें जातकशास्त्राशीं तुलना करून पाहणें फार सुलभ झालें आहे. लोकभ्रमावर किंवा लोकांच्या अंधश्रद्धेवर भरंवसा ठेवून शास्त्र टिकविण्याचा आग्रह धरणें हें योग्य नाहीं. सत्य हें स्वतःच्या सामर्थ्यावरच विजयी होत असतें. **शास्त्रानें आपलें प्रामाण्य लोकांच्या बुद्धिवादाला आव्हान देऊनच सिद्ध करणें हेंच नैतिकदृष्टया योग्य होय.** जातकाची वैज्ञानिक कसोटी वर्तमानकाळांत सुलभ आहे. परंतु सामुद्रिकासारख्या लक्षणशास्त्राची कसोटी पुष्कळ अस्पष्ट आहे. म्हणून लक्षणशास्त्राचें प्रामाण्य स्थापित करणें अधिक कठीण आहे.

## प्रगतीचीं शुभचिन्हें

ज्योतिर्गणित या विद्येचें अध्ययन व अध्यापन पाश्चात्यांच्या बरोबरीला कसें आणता येईल यासंबंधीं आपल्या ज्योतिर्विदांनीं प्रयत्न केले पाहिजेत. अद्ययावत् साधनसामग्री निर्माण करणें हें आपल्या देशांत राज्यसंस्थेसच झेपणारें काम आहे, कारण तें फार खर्चाचें आहे. परंतु ज्योतिर्विदांनीं केवळ विद्येकरितां विद्या असा आदर्श पुढे ठेवून यत्न केला पाहिजे. पंचांगविद्या ही सर्वांगीण बनविली पाहिजे. पंचांग निर्मितीचें कार्य आपापल्या प्रादेशिक भाषेंतून करतां यावें म्हणून प्रत्येक प्रादेशिक भाषेंत व संस्कृतमध्यें अद्ययावत् करणग्रंथ लिहिले जावे व प्रकाशित व्हावे. त्याकरितां राजकीय प्रशासन व विद्वान् मंडळी यांचें परस्परांचें सहकार्य वाढत गेलें पाहिजे. त्याकरितां केन्द्र सरकारनें व राज्यसरकारनें ज्योतिषविषयक ग्रंथनिर्मितीला व संशोधनाला उत्तेजन मिळेल यासाठीं ज्योतिषविषयक तज्ज्ञाची स्थिर समिति नेमणें जरूर आहे.

प्राथमिक व माध्यमिक विद्यापीठीय शिक्षणक्रमांत आकाशनिरीक्षण, तारकाज्ञान व खगोलविषयक सूक्ष्मज्ञान करून घेण्याचीं आवश्यक साधनें उपलब्ध करून देणें आवश्यक आहे. हल्लींच्या पंचांगामध्यें घटिका व पळें या कालपरिमाणांचा उपयोग करीत असतात. कित्येक वर्षांपासून घटिकापळें हें कालमापन व्यवहारामधून नष्ट झालें आहे. त्यामुळें घटिकापळांच्या ठिकाणीं नवें कालपरिमाण घालणें आवश्यक नाहीं काय याचा विचार पंडितांनीं करावा. घटकापळांचें कालमापन आतां गणितयुक्त अनुमानानेंच करणें भाग आहे. तास, मिनिट व सेकंदांचे अंश अशाच तऱ्हेचीं सूक्ष्मकालमिति दाखविणारीं साधनें वा यंत्रें आतां प्रचारांत आलीं आहेत. घटिका, पळें व त्याहिपेक्षां सूक्ष्म कालांश दाखविणारें यंत्र उपलब्ध नाहीं. तसें यंत्र सहज करतां येईल. परंतु त्याचा व्यवहारास किंवा शास्त्रसंशोधनास किंवा शास्त्रज्ञानास कोणीच उपयोग करणार नाहीं. आतां दृक्प्रत्ययाचा वाद आपोआप मिटला आहे. नव्या आल्मनाकशी जुळतीं अशींच पंचांगें सर्वसामान्य झालीं आहेत. हें फारसा वादविवाद न होतां घडलें आहे. ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीचीं शुभ अशीं पूर्व लक्षणें दिसूं लागलीं आहेत. त्यावरून भारतीय पंडितांतहि ज्योतिषशास्त्राची उपासना अधिक प्रगतिपथावर जाईल अशी आशा करून हें भाषण संपवितो.








प्रा. नारायणशास्त्री द्रविड

# मानव आणि विश्व : भारतीय व अभारतीय दृष्टिकोन ( पूर्वार्ध )

आज जगांत नांदत असलेल्या संस्कृतींची बरवर पाहणी केली, तर त्यांचे दोन परस्पर विभिन्न प्रकार दिसून येतात. यांपैकीं एकीस (साधारणपणें) भारतीय व दुसरीस अभारतीय असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. दुसऱ्या प्रकारास पुष्कळ लोक 'पाश्चिमात्य' असें नांव सुचवतील, कारण जें भारतीय नाहीं तें पाश्चिमात्य व जें पाश्चिमात्य नाही, तें भारतीय असें त्यांच्या मतें समीकरणच बनलेलें असतें. पण येथें संस्कृतीचे दोन वेगवेगळे प्रकारच विवक्षित असल्यानें भौगोलिक किंवा इतर प्रकारच्या भेदांकडे आपणांस लक्ष देण्याचें कारण नाहीं. तसेंच ज्या लोकांना असें वाटतें कीं संस्कृतीचे दोन किंवा अनेक प्रकार होऊंच शकत नाहींत, सर्व जगाची एकच संस्कृति आहे. त्या लोकांच्या बोलण्याकडेहि आपणांस फारसें लक्ष देण्याचें कारण नाहीं.

पण जातां जातां या लोकांच्या मतासंबंधीं एका गोष्टीचा निर्देश करण्यासारखा आहे. जे लोक विशेषें-करून कांहीं भारतीयच– फार आग्रहानें असें म्हणतात कीं, भारतीयांची अशी वेगळी संस्कृति असणेंच शक्य नाहीं, कारण इतर देशवासीयांसारखीच आपलीहि राहणी, विचार वगैरे आहेत. आपल्यांत विशेष असें कांहीं नाहीं, जे गुणदोष इतर लोकांत आहेत ते आपल्यांतहि आहेत ( मुख्यतया दोषच ) इ. ते इतर लोकांच्या संस्कृतीचे गोडवे अभिमानानें गातात पण आपली अशी वेगळी संस्कृतीच नाही असें म्हणायला मागेपुढे पहात नाहीत !

## प्रस्तुत विषयाच्या मर्यादा

आज सर्व जगांत एकच संस्कृति व्यास आहे कीं वेगवेगळ्या संस्कृति वेगवेगळ्या देशांत नांदत आहेत हा थोडा कठीण प्रश्न आहे. कारण कोणत्या गोष्टी संस्कृतिभेदाच्या निदर्शक समजावयाच्या हा उपप्रश्न सोडवल्याशिवाय हा प्रश्न सोडविणें शक्य नाहीं. पण हा उपप्रश्न हाताळणेंहि सोपें नाहीं. कारण त्यांतून संस्कृति म्हणजे काय ? असा एक अवांतर प्रश्न निर्माण होतो. ह्याचें समाधानकारक उत्तर देणें आवश्यक होऊन बसतें. पण प्रस्तुत विषय जरा वेगळ्या प्रकारचा असल्यामुळें व पुढील विवेचनांत या प्रश्नउपप्रश्नांची ओझरती चर्चा आलेली असल्यामुळें सरळ विषयाकडे वळणेंच योग्य होईल.

## संस्कृतींच्या आधारभूत प्रेरणा

भारतीय व अभारतीय असें संस्कृतींचे दोन प्रकार जर ठरवले तर या प्रकारांचें स्वरूप काय असा प्रश्न येथें आपोआप उत्पन्न होतो. त्याचाच प्रामुख्यानें या लेखांत विचार करावयाचा आहे. पण त्यापूर्वी हें सांगणें आवश्यक आहे कीं कोणत्याहि संस्कृतीचें स्वरूप किंवा वैशिष्ट्य काय आहे हें ठरवतांना तिच्या निव्वळ बाह्य किंवा दृश्य स्वरूपाचा विचार करून चालणार नाही. एखाद्या फार मोठ्या झाडाला ज्या प्रमाणें त्यापासून पुष्कळ दूर व खोल असलेल्या भूगर्भांतील ओलाव्यापासून पोषण मिळत असतें त्याच-प्रमाणें कोणत्याहि संस्कृतीचें बाह्यरूप कसेंहि असल तरी तिला पोषण देणाऱ्या व तिच्या आधारभूत ज्या बौद्धिक व भावनात्मक प्रेरणा आहेत त्यांवरूनच तिचें खरें स्वरूप ठरवावें लागेल. या दृष्टीनें विचार केल्यास असें साधारणपणें म्हणतां येईल कीं मानव व विश्व यांच्या परस्परसंबंधाविषयींच्या वेग-वेगळ्या प्रकारच्या कल्पनांतूनच वर निर्देशिलेल्या दोन संस्कृतींचा जन्म झालेला आहे व त्या कल्पनांपासूनच त्यांना आजहि पोषण मिळत आहे. या संस्कृतींच्या पुरस्कर्त्यांच्या संपूर्ण जीवनांत व जीवन विषयक दृष्टि-कोनांत या कल्पनेचेंच त्यांना कळत न कळत प्रतिबिंब उमटलेलें असतें असेंहि म्हणावयास हरकत नाहीं. म्हणून त्या मूलभूत कल्पनांचें स्वरूप ओळखल्यास त्यांनी अनुप्राणित झालेल्या संस्कृतीचें स्वरूपहि चटकन लक्षांत येऊं शकेल.



अनुक्रमणिका






## पाश्चिमात्य विचारसरणीला पहिला हादरा

अभारतीय संस्कृतीच्या मुळाशीं असलेली कल्पना अशी आहे कीं, मानव हा विश्वाचा एक अत्यन्त लहान 'क्षुद्र' असा घटक आहे. एका क्षुद्रातिक्षुद्र किड्यापेक्षां जास्त महत्व मानवाच्या अस्तित्वाला या विशाल विश्वाच्या अनन्त विस्तारांत देतां येत नाहीं. एकेकाळीं पाश्चात्य देशांत असा व्यापक समज होता कीं ईश्वराच्या सृष्टींत मानवाचें सर्वांत वरचढ असें स्थान आहे; कारण त्यासाठींच ईश्वरानें पृथ्वी निर्मिली व सूर्य, चंद्र, तारा इत्यादि वस्तु त्याला प्रकाश देण्यासाठीं व त्याचें जीवन सर्व तऱ्हेनें सुखी करण्यासाठीं उत्पन्न केल्या म्हणूनच कोपर्निकसच्या (पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते हें ठरवणारा ज्योतिषी) काळापर्यंत पाश्चात्य लोक असेंच समजत कीं पृथ्वी ही सर्व विश्वांत श्रेष्ठ आहे. (कारण ती माणसांसाठीं रचलेली आहे.) सूर्य तिच्यासाठीं असल्यानें तोच तिच्याभोंवतीं फिरतो. पृथ्वीचें फिरणें ही गोष्ट मानवाच्या श्रेष्ठत्वाला बाध आणणारी आहे. कोपर्निकसनें पृथ्वीचें चलत्व सिद्ध केल्यानें पाश्चात्यांमधील परंपरागत विचारसरणीला फार मोठा हादरा बसला. कारण पृथ्वीच्या स्थिरतेची परंपरागत कल्पना एका अत्यंत व्यापक अशा कल्पनेचेंच – म्हणजे वर नमूद केल्याप्रमाणें एका संस्कृतीच्या मूलभूत कल्पनेचेंच – अंग होती. म्हणून विश्वाचें केंद्र पृथ्वी नाहीं हें दिसूं लागल्यावर आपलें तरी विश्वांत मध्यवर्ती असें स्थान (म्हणजे महत्व), असूं शकतें काय ? असा प्रश्न कोपर्निकसच्या परवर्ती विचारकांना भेडसावूं लागला असल्यास नवल नाहीं.

## यंत्रयुगाचा धक्का

कोपर्निकस नन्तर, गॅलीलियो, केप्लर, न्यूटन, डार्विन, इत्यादि एकानन्तर एक शास्त्रज्ञ निपजले. त्यांनी प्रत्यक्षपणें परंपरागत विचारसरणीवर (डार्विनखेरीज करून) जरी आघात केला नाहीं तरी त्यांच्या शोधांतून जे जे निष्कर्ष निघाले ते सर्व मानवाच्या श्रेष्ठत्वाच्या मूलभूत कल्पनेला घातकच होते. म्हणून ज्याप्रमाणें ज्योतिषाच्या क्षेत्रांतून भूकेन्द्रिक कल्पनेचें निष्कासन झालें त्याचप्रमाणें जीवनाच्या व्यापक क्षेत्रांतून मानवकेन्द्रिक (Anthropocentric) कल्पनेची ही क्रमशः पीछेहाट होऊं लागली. ही पीछेहाट क्रमाक्रमानें झाली असती तर वरील मूळ कल्पनेवर तिचा विशेष परिणाम झाला नसता. पण सतराव्या शतकापासून लहान मोठ्या यंत्रांची निर्मिति होऊं लागली व ती क्रमाक्रमानें वाढतच राहिली. या घटनेचा आघात या कल्पनेला असह्य झाला असावा. हजारो माणसांचें काम चुटकीसरसें एक निर्जीव यंत्र करूं लागलेलें पाहून माणसासारखा माणूस यंत्रापेक्षाहि तुच्छ आहे कीं काय असें तत्कालीन विचारवंतांना वाटणें साहजिकच होतें. यंत्रयुगानें घडवलेली औद्योगिक क्रान्ति ही केवळ आर्थिक स्वरूपाची क्रान्ति नव्हती; ती मानवाच्या सांस्कृतिक कल्पनेतलीहि क्रांति होती.

## आर्थिक संघटनेंत माणसाला गौणत्व

लहान यंत्रानंतर मोठीं यंत्रें आलीं व त्यांतून संघटना (Organisations) किंवा संघटित व सामुदायिक कार्य करण्याचें तंत्र पुढें आलें. पूर्वी जो माणूस एक एक यंत्र हाताळीत होता तोच आतां त्या यंत्राचा फक्त एक भागच हाताळूं लागला. त्याच्या कामांत व जीवनांत यांत्रिकता आली. त्याचा उरला सुरला अभिमान यंत्रांनी हिरावून घेतला. पूर्वी त्याला आपल्या मनुष्यत्वाचाच अभिमान वाटत असे. आतां त्याचें मनुष्यत्व तर राहिलें बाजूला, त्याचें व्यक्तिमत्व देखील अर्थशून्य व नगण्य ठरूं लागलें. यंत्रा भोंवतीं निर्माण झालेल्या (कारखाने, गिरण्या इत्यादि) विशाल संघटनांमध्यें व्यक्ति 'दर्यामें खसखस' सारखी अगदीं अस्तित्वशून्य होऊन बसली. पण व्यक्तीच्या अभिमानाचा उतार येथेंच थांबला नाहीं. मानवत्वाचा अभिमानहि कुचकामाचा ठरला, तरीपण आपल्या वैयक्तिक जीवनांमध्यें व्यक्ती आपल्या मोठेपणाचा अभिमान बाळगून राहूं शकत होती.

## स्वप्नांतील आनंददेखील हिरावला

पण शास्त्रज्ञांनी तेथेंदेखील व्यक्तीची नाचक्की करण्यास कमी केलें नाहीं, फ्रायड नांवाच्या मानसशास्त्रज्ञाने या काळीं असा सिद्धांत जगापुढें मांडला कीं कोणत्याहि व्यक्तीला आपल्या चांगुलपणाचा जो अभिमान वाटतो तो निराधार आहे. आपण सद्विचाराच्या प्रेरणेने बहुधा आचरण करीत नसतो. ज्या विचारांचा पगडा आपल्या जीवनावर असतो ते आपल्या

ज्ञात व चांगल्या विचाराहून वेगळेच असतात. फ्रायडनें व्यक्तीच्या जीवनांतल्या अत्यंत वैयक्तिक अशा बाबीवर–म्हणजे स्वप्नांवर–ही घाला घातला. जागेपणीं नाहींतर नाहीं निदान स्वप्नांत तरी व्यक्तीला आपल्या मोठेपणाचा काल्पनिक आनंद घेऊं द्यावयाचा. पण शास्त्रज्ञांना तेंहि खपलें नाहीं. स्वप्नांसंबंधीं त्यांनीं असा सिद्धान्त मांडला कीं, जागृत अवस्थेंतील वैफल्याची प्रतिक्रिया हेंच स्वप्नाचें खरें स्वरूप आहे!

## मानवाच्या वैशिष्ट्याचें निर्मूलन

जणूं कांहीं एवढ्यानें मानवी अभिमानाचें निर्दालन झालें नाहीं म्हणून प्रायोगिक मानसशास्त्रानें यानंतर सर्व अभिमानाचें मूळ जें मन त्याच्यावरच आक्रमण करावयास सुरवात केली! मनाच्या जागीं चेतना आली ( Structuralism ), चेतनेच्या जागीं चेतनक्रिया आली, ( Functionalism ), मग या क्रियेची जागा त्या क्रियेपैकींच जें प्रत्यक्षीकरण त्यानें घेतली व त्यानंतर चेतनेलाच अजिबात काट देण्यांत येऊन फक्त क्रीयाच ( Behaviourism ) शिल्लक ठेवण्यांत आली. याप्रमाणें मन = क्रिया असें समीकरण प्रस्थापित करून मानसशास्त्रानें मानवाच्या श्रेष्ठत्व कल्पनेचें मूळच नष्ट करून टाकलें. मनानंतर जीवनाचेंहि स्वतंत्र अस्तित्व नाकारण्यांत येऊं लागलें! प्रयोगशाळेंत सजीव पदार्थांच्या कृत्रिम निर्मितीची शक्यता जसजशी वाढूं लागली तसतसा जड चेतनामधला भेद देखील संशयास्पद ठरूं लागला. माणसासारखीं यांत्रिक माणसें व माणसापेक्षांहि जास्त सक्षम असलेलीं यंत्रें बनवितां येऊं लागलीं! अशा तऱ्हेनें मानवाचें म्हणून असें कांहींहि वैशिष्ट्य शास्त्रज्ञांनीं उरूं दिलें नाहीं.

## अण्वस्त्रांचें भय

मानवी श्रेष्ठत्वाच्या कल्पनेला सगळ्यांत मोठा धक्का जो अलीकडच्या काळांत बसला तो अणुशस्त्रांच्या निर्मितीनें! आपण जरी श्रेष्ठ नसलों तरी आपण निर्मिलेल्या वस्तु, कलाकृती, इत्यादि तर श्रेष्ठ आहेत व त्या तरी टिकून राहतील व आपल्या निर्मात्यांच्या मोठेपणाची परोक्षपणानेंच कां होईना – साक्ष पटवितील अशी आशा आतांपर्यंत मानवी मनांत कायम होती. पण आतां त्या आशेची जागा भीतीनें घेतली आहे! एकाच अणुबाँबच्या प्रयोगानें एक मोठें शहर जर बेचिराख होऊं शकतें तर संपूर्ण मानवीसृष्टि व जग नाहींसें करण्यास कितीसे अणु बाँब लागणार, हा प्रश्न आज विचारवंतांनाहि जाचत आहे!! यावरून आजचें मानवी जीवन धाडस, आशा, महत्वाकांक्षा इत्यादि भावनांपेक्षां भीति व काळजी या भावनांवरच विशेष अधिष्ठित आहे असें दिसून येतें. पूर्वीचा स्वाभिमान व आशावाद, पाश्चिमात्य विचारावर पोसलेल्या आजच्या सुशिक्षित मानवाच्या मनांत टिकून राहिलेला नाहीं व तसा तो राहूं शकत नाहीं. " Philosophy for our Times " या आपल्या विचारपूर्ण ग्रंथांत सी. ई. एम्. जोड म्हणतो कीं पूर्वी लोकांना मूल्याविषयीं आदर होता. त्यामुळें स्वतः मूल्यांची उपासना करणें, किंवा जे ती उपासना करतात त्यांचा आदर करणें, किंवा त्यांची नक्कल करणें, हें लोकांना आवडत असे. पण आज मूल्यांचें महत्वच वाटेनासें झाल्यामुळें मानवी जीवनामध्यें अभिमान बाळगण्याजोग्या अशा गोष्टीच फारशा राहिलेल्या नाहींत.!"

## मूलभूत कल्पनेंतील फरक

वैज्ञानिक प्रगतीचा वरील आढावा विचारांत घेतल्यास असें वाटूं लागतें कीं जणूं कांही मानवाची पूर्णपणें नाचक्की करण्यासाठींच पाश्चात्य राष्ट्रांत विज्ञानाचा अवतार झाला असावा. पण वस्तुस्थिति मात्र अशी दिसून येते कीं मानवी जीवनाच्या विभिन्न अंगोपांगाचा विचार करणारीं शास्त्रें वेगवेगळ्या लोकांनी निर्मिलीं व वाढविलीं. मग या शास्त्रांच्या निष्कर्षांत इतकी सुसूत्रता कशी आली? या प्रश्नाचें उत्तर वर नमूद केलेल्या मानव व विश्व यांच्या परस्पर संबंधाविषयींच्या मूळ कल्पनेंत आहे. भारतीयेतर व विशेषतः पाश्चात्य देशांत प्रागैतिहासिक कालापासूनच ही कल्पना बीजरूपानें तेथल्या संस्कृतींत दडलेली आहे. विज्ञानयुगांत या कल्पनेला अंकुर फुटूं लागले. पदार्थ, रसायन, इत्यादि विज्ञानांनींच नव्हें तर सर्वच विज्ञानांनी व शास्त्रांनी इतकेंच काय तत्वज्ञानानें देखील, ही कल्पना गृहीत धरूनच पाश्चात्य देशांत जगाचा विचार सुरूं केला. त्यामुळें साहजिकच त्यांना मानवाची क्षुद्रता प्रस्थापित करणाऱ्या गोष्टीच विशेषतः दिसूं लागल्या. माणूस विश्वापेक्षां मोठा आहे हा विचार सिद्ध होईल अशा








गोष्टींकडे त्यांचें लक्षच जाऊं शकलें नाही, किंवा लक्ष गेलें तरी त्या गोष्टी या विचारकांच्या मनांत भरूं शकल्या नाहींत. इतकेंच काय, ज्या विचारशक्तीच्या किंवा बुद्धीच्या मदतीनें या सर्व गोष्टी समजावयाच्या त्या शक्तीचें किंवा बुद्धीचें या शास्त्रज्ञांना महत्व वाटेनासें झालें.

## रसेलची ' ज्ञाना ' विषयीं कल्पना

आजचा सर्वश्रेष्ठ वैज्ञानिक तत्वज्ञ ( Philosopher of science ) बर्ट्रंड रसेल यानें अनेक ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं ज्ञान ही विश्वांमधील अत्यंत क्षुद्र अशी बाब आहे. प्राणिसृष्टीमध्यें देखील ज्ञान कांही कांही ठिकाणीच दिसून येतें. मानवामध्यें जें ज्ञान अभिव्यक्त अवस्थेंत असतें तें इतर प्राण्यांमध्यें अनभिव्यक्त स्वरूपांत दिसून येतें. मानवांत सुद्धा ज्ञान एकसारखें असत नाहीं. संपूर्ण विश्वाच्या भूत, भविष्य व वर्तमान काळाचा विचार केला तर ज्ञान ही अगदीच तुच्छ अशी वस्तु आहे असें कोणासहि वाटल्यावाचून राहणार नाहीं. आपलें ज्ञान विश्वावर अवलंबून आहे. म्हणून त्याची सत्यासत्यता विषयांवरून ठरविली पाहिजे. ज्ञानावरून जगाचें किंवा कोणत्याहि वस्तूचें स्वरूप ठरविणें हें शुद्ध मूर्खपणाचें आहे. इत्यादि. रसेलच्या या उक्तींत वरील कल्पनेचें प्रतिबिंब स्पष्टपणें दिसून येतें. रसेल विज्ञानांचा पुरस्कर्ता असल्यामुळें त्यानें वैज्ञानिक दृष्टिकोनांतून ज्ञानासंबंधीं जे विचार मांडले आहेत ते बरोबरच आहेत.

## त्याच्या विचारसरणींतील विरोध

या विचारांची पुढें चर्चा येईलच. पण एका गोष्टीचा मात्र येथें उल्लेख केल्याशिवाय राहवत नाहीं. ती ही कीं ' ज्ञान ' ही जर इतर सर्व मानवीय गोष्टीप्रमाणें एक तुच्छ व क्षणभंगुर अशी वस्तु आहे तर तें ज्ञान ज्या शास्त्रांत सांठवलें आहे त्या शास्त्रांचा रसेल-सारख्या विद्वानानें कां पाठपुरावा करावा ? एकीकडे ज्ञानाला तुच्छ म्हणावें व दुसरीकडे सत्य म्हणून ज्ञानाला उचलून धरावें या परस्परविरुद्ध भूमिकांची संगति कशी लावावी ? भौतिक शास्त्रेंच ज्ञानाची तुच्छता सिद्ध करून दाखवितात म्हणून त्यांचें अध्ययन करावयाचें असें रसेलला म्हणावयाचें आहे काय ? ' A Free Man's Worship ' या आपल्या एका लेखांत रसेल म्हणतो कीं, 'आदर्श हें इतर वस्तूं-प्रमाणेंच नश्वर व क्षणभंगुर असलें म्हणून काय झालें ? आदर्शाच्या मननांतच उदात्ततेचा खराखुरा साक्षात्कार होतो ? पण ही उदात्तता जर मानवांत मुळांतच नाहीं तर तिचा त्याला जो साक्षात्कार होतो तो निव्वळ अध्यासरूप ठरत नाहीं काय ? रसेलनें कोठेंच आपल्या मनांतील या विरोधाची चर्चा केलेली नाहीं. असो.

## प्राचीन यवनांची कल्पना ( Greek )

मानवाच्या क्षुद्रतेची कल्पना यवन संस्कृतीत सुद्धां दिसून येते. यवनांच्या बहुतेक सर्व दंतकथांत मानव व देव यांचा पदोपदीं संघर्ष व त्यांत मानवाचा पराभव वर्णिलेला असतो. यवनाचे देव हीं निसर्गातील विविध शक्तींचीं प्रतीकेंच होत. म्हणून माणूस निसर्गाच्या हातांतील एक क्षुद्र खेळणें आहे, असा विचार यवन संस्कृतींत पूर्णपणें दृढमूल झाला आहे असें दिसून येतें. अरिस्टॉटल, एपिक्यूरस इत्यादि परवर्ती यवन तत्वज्ञांच्या विचारांत निसर्ग व देवादिक यांविषयीं उपेक्षाभाव दिसून येतो खरा, पण तो या शक्तींच्या कमकुवतपणाच्या कल्पनेंवर आधारलेला नसून ' कांहीही केलें तरी जें व्हायचें आहे तेंच होणार, मग कशाला उगीच काळजी करा ? ' अशा प्रकारच्या भाग्यवादाचा तो परिणाम आहे, असें तत्कालीन ग्रीसच्या इतिहासावरून दिसून येतें.

## शोकान्त नाटकांचा हेतु

यवन नाटककार एस्किलस, सोफोक्लीस इत्यादि-कांच्या कांहीं शोकान्त नाटकांवरूनहि यवनांच्या मानवविषयक वरील कल्पनेचें प्रत्यन्तर येतें. साधारणपणें साहित्यांत प्रत्यक्ष जीवनाचेंच साहित्यिक चित्रण करीत असतो. सामान्य जीवन कांही विशेष शोकपूर्ण किंवा विशेष सुखमय असें नसतें. पण या प्राचीन नाटककारांनीं मात्र मोठ्या लोकांच्या जीवनाची शोकान्त परिणति आपल्या नाटकांत दाखविण्याचा आग्रह धरला. त्यांना हें सत्य लोकांपुढें मांडावेसें वाटलें असावें कीं कोणी कितीहि मोठा असला तरी तो नियतीच्या कात्रींत सांपडल्या-शिवाय रहात नाहीं. म्हणूनच यामुळें शोकान्त नाटका-साठीं सामान्य नायक चालत नाहीं. सामान्य माण-साच्या नियतीच्या हातून होणारा पराभव त्याच्या कम-कुवतपणामुळें होणें शक्य आहे. यांत मानवाच्या

स्वाभिमानाला दुखविणारें असें कांही नाही. मोठ्याहून मोठा व समाजांत अत्यंत समर्थ समजला जाणारा माणूस नियतीपुढे पडला तर त्या घटनेच्या अनुभवांतूनच मानवी जीवनाच्या क्षुद्रतेचा साक्षात्कार होऊं शकतो. हा साक्षात्कारच ग्रीस देशाच्या आद्य नाटककारांना आपल्या शोकान्त नाटकांच्या द्वारें लोकांस घडवून द्यावयाचा होता.

## प्लेटोची असामान्यता

प्लेटो मात्र या दृष्टिकोनाला पूर्णपणें पारखा होता. यवन तत्वज्ञांमध्यें तोच एक असा असामान्य पुरुष आहे कीं ज्यांत सर्व तऱ्हेच्या प्राचीन विचार प्रवाहांचें विलक्षण संमिश्रण झालें आहे. पायथागोरॅसकडून त्याला गूढानुभूतीचा वारसा मिळाला होता. त्यानें कधीच मान्य केलें नाही कीं दृश्य विश्व अदृश्य आदर्शांच्यापेक्षां श्रेष्ठ किंवा त्यांच्या तोडीचेंहि असूं शकतें. त्याच्या काल्पनिक आदर्श राज्याचे शासक जे तत्वज्ञ ते सदोदित आदर्श विश्वांच्या मननांतच लीन असतात. त्यांना लोकोपकारास्तव बळेंच आपलें लक्ष दृश्य विश्वाकडे वळवावें लागतें. तरीपण ते या विश्वांत भुलून जात नाहींत. जोंपर्यंत आदर्शांचा साक्षात्कार झाला नाहीं तों पर्यंतच माणूस दृश्य जगतांत गुरफटलेला असतो. पण या आदर्शांची प्रतीति त्याला बाहेरून मिळवावी लागत नाही. ती त्याच्या आत्म्यांतच वसत असते. त्याला फक्त त्या प्रतीतीची आठवण जागृत करावी लागते. तसें केलें कीं या तत्वज्ञाला सत्याचा पूर्ण साक्षात्कार आपोआप होतो व तो नियतीच्या बंधनांतून पूर्णपणें सुटतो.

याप्रमाणें प्लेटोच्या तत्त्वज्ञानांतून जरी मानवश्रेष्ठतावाद स्पष्टपणें झळकत असला तरी त्याचा यवन संस्कृतीशीं किंवा तिच्यांतून विकास पावलेल्या पाश्चात्यसंस्कृतीशीं संबंध जोडणें उचित नाहीं. पाश्चात्य तत्वज्ञानाच्या इतिहासांत प्लेटोचें स्थान असामान्य आहे. त्याची विचारसरणी पाश्चात्य विचारपरंपरेच्या बाहेरची श्रेष्ठता आहे. म्हणून प्लेटोवरून पाश्चात्य संस्कृतीला मानववादी ठरवतां येणार नाहीं.

भारतीय संस्कृतींतील मूलभूत कल्पनांचा विचार पुढील लेखांत करूं.

---










श्री. वि. गो. दिघे

# हिंदी स्वातंत्र्याचा इतिहास

देशाच्या स्वातंत्र्यलढ्यांत अनेक व्यक्तींनीं भाग घेतलेला असतो. त्यांनीं केलेलीं पराक्रमाचीं, निःसीम त्यागाचीं कृत्यें यांची स्मृति केव्हांहि सुखदायक असते. स्वातंत्र्यलढ्यांचें स्मरण ही प्रत्येक राष्ट्राची संपत्ति होय. दर नव्या पिढीला यापासून स्फूर्ति प्राप्त होते. यास्तव पाश्चात्य राष्ट्रांत स्वातंत्र्यलढ्याचे इतिहास लिहिले गेले. आमच्याकडेहि देश विमुक्त होण्यापूर्वी स्वातंत्र्यचळवळीचे वृत्तांत अनेकांनीं लिहिले आहेत. अॅनी बेझंट, अंबिकाचरण मुजुमदार, सुभाषचंद्र बोस, हिरेन मुखर्जी, प्रो. देसाई, फाटक, जावडेकर, इत्यादिकांनीं या विषयावर मौलिक ग्रंथ तयार केले आणि त्यांना मान्यताहि मिळाली. गांधी, नेहरू, यांचीं आत्मचरित्रें या राष्ट्रीय लढ्याच्या हकीकतींनीं भरलेलीं आहेत.

मग १९५३ सालापासून सरकारनें या विषयांकडे लक्ष कां पुरविलें ? या विषयाची सांगोपांग शास्त्रीय चर्चा व्हावी, आमच्या राष्ट्रीयत्वाचीं सामर्थ्यस्थानें कोणतीं, वैगुण्यें कोणतीं, दोष कोठें आहेत, हें लक्षांत यावें, सर्व सामग्री तपासली जावी, याकरिता मध्यवर्ती सरकारनें एक तज्ज्ञांचें बोर्ड नेमून सर्व देशांतून माहिती मिळविण्याचे प्रयत्न सुरूं केले. प्रत्येक प्रांतांतील सरकारी दप्तरांची तपासणी होऊन त्यांतून इंग्रजी अमलाविरुद्ध जे उठाव झाले, ज्या सामाजिक आणि राजकीय चळवळी झाल्या, ह्याबाबत कागदपत्रांचा अभ्यास सुरूं झाला. बिहार, हैदराबाद, सारख्या प्रांतांनीं आपल्या प्रदेशापुरत्या चळवळीच्या हकीकती लिहून काढल्या; तर मुंबई, उत्तरप्रदेश यांनी निवडक कागदपत्रें प्रसिद्ध करण्याचें धोरण ठेवलें. मध्यवर्ती बोर्डानेंहि एक छोटीशी कचेरी स्थापून तिच्या डायरेक्टरकडे अखिल हिंदुस्थानांतील लढ्याचा शास्त्रीय इतिहास लिहिण्याचें काम सुपूर्द केलें. सामग्री जमा होतां होतां पांच वर्षें निघून गेलीं आणि मुख्य इतिहासलेखनास सुरवातच होईना ! तेव्हां १९५८सालीं सरकारनें डॉ. ताराचंद यांची या कामावर नेमणूक केली. डॉ. ताराचंद हे इतिहास – राजकारण शास्त्राचे तीस वर्षांवर अध्यापक असून ह्यांनी शिक्षणखात्यांत इतरहि महत्त्वाच्या जबाबदाऱ्या पार पाडल्या आहेत. विषयाचें महत्त्व जाणून त्यांनीं विनावेतन हें काम करण्याचें कबूल केलें. १९५८ च्या शेवटीं कामाला सुरवात झाली आणि १९६१ च्या २६ जानेवारीस त्यांचा पहिला प्रास्ताविक खंड प्रसिद्ध झाला.

## प्रास्ताविक खंडावरून उठलेलें वादळ !

या प्रास्ताविक खंडाबाबत मोठें वादळ माजून राहिलें आहे. पार्लमेंटमध्यें चर्चा होण्याचा अभूतपूर्व मान या ग्रंथाला प्राप्त झाला ! आणि आतां मराठी वर्तमानपत्रांतून यावर टीका होत आहे. पार्लमेंटमध्यें डॉ. ताराचंदांनीं पुस्तकांत गैरलागू मजकूर घुसडला आहे, ते मुसलमानधार्जिणे आहेत, अराष्ट्रीय आहेत, इंग्रजांचे पक्षपाती आहेत, कम्युनिस्टवादी आहेत, इत्यादि आरोप त्यांच्यावर करण्यात आले. मराठी वर्तमानपत्रें व मासिकें ( लोकसत्ता, नवभारत इत्यादि ) यांत त्याचेच पडसाद उमटले. शिवाय डॉ. ताराचंदांचेवर आणखीहि आरोप करण्यांत आला, कीं लेखकाच्या मनांत मराठ्यांबाबत अढी, अनादर, वसत आहे. मराठ्यांची इतिहासकालांतील कामगिरी त्यांना एकतर समजली नाहीं; किंवा समजून त्यांनीं विकृत स्वरूपांत वर्णन केलें आहे. तेव्हां या पुस्तकाचें खरें स्वरूप समजून घेऊन मग लेखकावरील आरोप कितपत खरे आहेत हें आपण पाहूं.

हिंदी राष्ट्रीय लढ्याचें महत्त्व केवळ या देशापुरतें मर्यादित राहिलें नसून बाह्य जगावरहि त्याचे परिणाम झाले आहेत. १९४७ सालीं या देशावरील ग्रेट ब्रिटनचें अधिराज्य संपुष्टांत आलें. तेव्हां ब्रह्मदेश, इंडो-चीन, इंडोनेशिया, इत्यादि आशियाई राष्ट्रेंहि विमुक्त झालीं. पण अठराव्या शतकांत हे पौर्वात्य देश एकामागून एक पाश्चात्यांच्या आक्रमणास बळी पडले. या गुलाम बनलेल्या देशांपैकीं आपल्या गुलामगिरीची प्रथम जाणीव झालेला देश आमचा हिंदुस्थान.








पाश्चात्यांशीं राज्यकर्ते आणि व्यापारी म्हणून आलेले संबंध आणि पाश्चात्य विद्या यामुळें आमच्या समाजांत चिकित्सक बुद्धि जाग्रत झाली. तिच्या साह्यानें आम्ही आमच्या सामाजिक, आर्थिक, धार्मिक, संस्था आणि सामाजिक मूल्यें यांचें निरिक्षण करूं लागलों आणि परकीय अमलाला विरोध सुरू केला. हिंदुस्थानच्या इतिहासांतील ब्रिटिश अमलाचा भाग आमच्या लोकांची मानहानि, दारिद्र्य आणि इतर अत्यंत दुःखद स्मृती यांनीं भरलेला आहे. पण शेवटीं राष्ट्रांतील स्वत्व जागें झालें. लोकशाहीच्या तत्त्वाचा स्वीकार करून हिंदी समाज प्रगतीचा मार्ग चालूं लागला आणि आमच्या गुलामगिरीच्या शृंखला एकामागून एक सैल पडत चालल्या. हिंदी स्वातंत्र्याच्या लढ्याचें स्वरूप केवळ राजकीय नाहीं. आमचा शत्रू बाहेर होता तसा घरांतहि होता. आमच्या प्राचीन सामाजिक संस्थांनीं, धार्मिक आचारविचारांनीं, आमच्या समाजांत दौर्बल्य आणलें होतें. आमचें सामाजिक जीवन शतशः विदारलें गेलें होतें. सामाजिक स्थित्यंतराविना या राष्ट्रास तरणोपाय नव्हता. नवविद्येचा स्वीकार करून, नवे विचार ग्रहण करून, हा प्राचीन समाज जाग्रत झाला, आणि त्यानें नव्या जगांत पदार्पण केलें हें आमच्या स्वातंत्र्य इतिहासाचें सार होय. राष्ट्रीयत्वाची वाढ आमच्या देशांत कशी होत चालली आहे याचें समाजशास्त्राच्या दृष्टीनें आतांपर्यंत विवेचन झालें नाहीं ते या ग्रंथांत प्रथमच होत आहे. मग अज्ञानानें या विवेचनाला कांहीं टीकाकार 'नमन' म्हणोत, 'गुन्हाळ' म्हणोत, वा 'गॅझेटिअर विभाग' म्हणोत. खरी परिस्थिति ही अशी आहे.

## ग्रंथकर्त्याची भूमिका

ग्रंथकर्त्यानें याबाबत आपली भूमिका सुरुवातीसच स्पष्ट केली आहे. प्रस्तावनेंत त्यानें सांगितलें आहे कीं, "I had to trace the history of the freedom movement and not merely to relate the story of the achievement of independence ... ... Freedom is more than the absence of foreign control, for it implies a society possessing certain positive attributes- a capacity to order its affairs in accordance with the will of the people and a democratic way of life ... In essence it is an ethical struggle both in relation to the foreigner as well as members of its own body " ग्रंथाच्या पहिल्या सवाशें पानांत ग्रंथकर्त्यानें या सामाजिक परिवर्तनाचा ऊहापोह केला आहे. सांस्कृतिक ऐक्यता असून या देशांत राजकीय ऐक्य कां निर्माण झालें नाहीं हा प्रश्न अनेकदां विचारला जातो. आम्ही भांडत राहिलों, एक झालों नाहीं, हें ठराविक सांच्याचें उत्तर या प्रश्नाचें खरें उत्तर ठरत नाहीं. समाजशास्त्राच्या बैठकीवर या प्रश्नाची लेखकानें विस्तृत चर्चा केली आहे. भौगोलिक दृष्ट्या हा देश विस्तारलेला, दळणवळणाचीं साधनें अगदी कमी, ही ऐक्याच्या मार्गांतील पहिली धोंड ; दुसरी म्हणजे भाषिक विभागणी. निसर्गानें विभागलेल्या या प्रदेशांत भाषिक विभागणीची भर पडली. आमच्या सामाजिक आर्थिक संस्थांनीं -जातिसंस्था आणि ग्रामसंस्था यांनीं या विभागणींत आणखी भर टाकली ! भिंती मागून भिंती उभारल्या गेल्या. असंख्य लहान लहान विभाग निर्माण झाले. मग ऐक्य कसें साधणार ? राज्यसंस्था मग त्या हिंदु असोत वा मुसलमानी असोत, बहुजनसमाजास त्यांत वाव नसल्यामुळें त्या तकलुपी ठरल्या आणि अराजकाची थोडी झुळुक लागतांच त्या कोसळून पडल्या !

## स्वातंत्र्य लढ्याचें द्विविध स्वरूप

हिंदी स्वातंत्र्याचा लढा केवळ परकीय सत्तेविरुद्ध नसून हतबल झालेल्या समाजाच्या अज्ञानाविरुद्ध, मनोदौर्बल्याविरुद्ध होता. आमच्या समाजांतील विवेचकबुद्धीचा व विज्ञानाचा अभाव, भोळसट समजुती, विलक्षण चालीरीती, नैतिक मूल्यांची शिथिलता आणि ब्रिटिशांच्या आक्रमणानें समाजांत घडून आलेली उलथापालथ, याचें विवेचन या पहिल्या प्रास्ताविक खंडांत केलं आह. अठराव्या शतकांत हिंदी समाज कसा पोखरून निघाला होता हें या भागांत विशद करून सांगितलं आहे.

## ब्रिटिश राजवटीचें अंतरंग

पहिल्या चार प्रकरणांत अठराव्या शतकांतील समाजाच्या अंतरंगाचें विच्छेदन झालें. अठराव्या शतकाच्या मध्याला ( १७५६ ) ब्रिटिश सत्तेचा उदय झाला. तिचा देशभर प्रसार होण्यास वेळ लागला नाहीं. इंग्रजी अंमल देशावर कायम करून स्वजनांच्या हिताकरतां या देशाची लूट करावयाची हें इंग्रजी कारभाराचें सूत्र होऊन बसलें. पार्लमेंटची सत्ता या देशावर चालू झाली. गव्हर्नर जनरल आणि इतर अधिकारी पार्लमेंटचीं धोरणें अमलांत आणूं लागले. लष्करी आणि मुलकी कारभाराच्या वरिष्ठ मोक्याच्या जागा विजेत्या गोऱ्यांनीं भरून काढल्या. नालायकीचा शिक्का देऊन एतद्देशीयांना त्यांतून वगळून काढलें. तलवारींचें सामर्थ्य वा लष्करी सत्ता हा नव्या राजवटीचा एकाकी आधार बनला. प्रजेच्या संमतीला तेथें वाव उरला नाहीं. लोककल्याणाकरितां, येथील शेती व उद्योगधंदे यांची भरभराट व्हावी याकरितां राज्याचा महसूल खर्च व्हावयाचा हें बाजूलाच राहिलें. उलट ही सर्व संपत्ति या ना त्या रूपानें ब्रिटिश तिजोरींत ओढली जाऊं लागली.

देशी राज्यें जाऊन ब्रिटिश राजवट आली. या सत्तापालटाचे अत्यंत घोर परिणाम झाले. सर्व देशावर दाट अभ्रपटल माजलें, देशाला अवकळा आली. लोक निष्क्रिय, निरुत्साही बनले. त्यांचे कर्तृत्व लोप पावलें. त्यांच्यांतील आत्मविश्वास ढळला. त्यांना जणूं भवितव्यच उरलें नाहीं. गुलामांतील सर्व अवगुण त्यांच्यांत वाढीस लागले. देशी राजेरजवाड्यांचीं शस्त्रास्त्रें हिरावून घेऊन त्यांचें लष्करी सामर्थ्य खची करण्यांत आलें. राज्यकारभारांतून हकालपट्टी करून क्षात्रवर्गाची गळचेपी करण्यांत आली. सामान्य जनतेला कोणी त्राता उरला नाहीं. करभारांच्या ओझ्याखालीं शेतकरी आणि कामकरी वर्गांना अजी दडपून टाकण्यांत आलें.

अशा परिस्थितींत ब्रिटिशांच्या आर्थिक धोरणांनींच हिंदुस्थानांत एक सामाजिक क्रांति घडवून आणली आणि नवे वर्ग निर्माण केले. या सामाजिक क्रांतिमुळें उदयास आलेल्या नवशिक्षित मध्यमवर्गानें ब्रिटिश सत्तेला विरोध सुरूं केला. येथपर्यंतची हकीकत या प्रास्ताविक खंडांत लेखकानें दिली आहे. एकोणिसाव्या शतकांत जागृति होऊन या देशांत निरनिराळे सामाजिक व राजकीय उठाव झाले. शेवटीं महात्मा गांधींच्या सत्याग्रहाच्या अमृत तत्त्वाचा स्वीकार करून हिंदी लोकांनीं स्वातंत्र्यसंपादन केलें त्याचा वृत्तांत पुढील दोन खंडांत येईल.

## वृत्तांतलेखन नव्हे, तत्त्वशोधन

या पहिल्या खंडाचें स्वरूप सर्वशः तत्त्वशोधनाचें ( Interpretative ) आहे. सरकार मार्फत जमा झालेली साधनसामग्री पुढील काळासंबंधी आहे. तिचा यथावकाश उपयोग करण्यांत येईल. या पहिल्या खंडाकरतां गॅझेटिअर्स्, सेन्सस रिपोर्ट आणि अठराव्या शतकांतील इतिहास याचा मुख्यतः आधार घेण्यांत आला आहे. डॉ. ताराचंदांची भूमिका निव्वळ वृत्तांत लेखकाची नसून तत्त्वज्ञाची आहे. राजाराण्यांचे विवाह आणि प्रेमकलह, राजदरबारांतील गुप्त मसलती, सरदारांची बंडें, लढाया, यांनीं इतिहास बनत नसून सामाजिक समस्यांचा, समाजाला जिव्हाळ्याच्या वाटत असलेल्या प्रश्नांचा, त्यांत ऊहापोह झाला पाहिजे अशी आम्ही आतां अपेक्षा करतों. ही अपेक्षा पुरी करणारा हा ग्रंथ आहे. ग्रंथाचें वास्तविक स्वरूप समजून न घेतांच उगाच टीकाकार हत्यार चालवितात त्यांची कींव करावीशी वाटते.

## मुसलमानधार्जिणेपणाचा वृथा आरोप

यानंतर टीकाकारांचे दोन मोठे आक्षेप कीं डॉ. ताराचंद मुसलमानांचे पक्षपाती आहेत आणि मराठी इतिहासाबद्दलचा त्यांचा दृष्टिकोण दोषैकपूर्ण आहे. या दोन्हीचीं उत्तरें पुस्तकांतच मिळतात.

डॉ. ताराचंद मुसलमानधार्जिणे आहेत, मुसलमानांच्या कोणत्याहि कृतींत त्यांना दोष दिसत नाहीं, मुसलमानी इतिहासाबाबत लिहितांना ते तल्लीन होतात, असें ज्यांना वाटतें त्यांच्या म्हणण्याचा मथितार्थ हा तर नाहीं कीं हिंदुस्थान हा देश हिंदूंचा, येथें मुसलमानी तत्त्वज्ञानाचा, राजकारणाचा, धर्मशास्त्रांचा विचार पाहिजे कशाला ? वास्तविक पाहातां मुसलमान आतां हिंदुस्थानांत येऊन सातशें वर्षें झालीं, हिंदूंच्या प्रमाणें ते या देशाचे अविभाज्य घटक बनले आहेत. अनेक प्रवाह मिळून हिंदी संस्कृति समृद्ध झाली आहे. त्या प्रवाहांपैकीं इस्लाम हा एक

आहे. राष्ट्रीय ऐक्यतेच्या दृष्टीनें या दोन्ही समाजांना एकमेकाच्या आचारविचारांची ओळख पटली पाहिजे. या ग्रंथांत हें विवेचन आलें आहे. तें ओढून ताणून आणलेलें नाहीं. त्याची या घटकेला अत्यंत जरूरी आहे.

बरें डॉ. ताराचंद सर्वच बाबतींत मुसलमानांची तरफदारी करतात हा आरोप तरी खरा आहे काय ? औरंगजेबाचा उद्योग, कष्ट, साहस इत्यादि सर्व गुण मान्य करूनहि त्यांनीं स्वच्छ सांगून टाकलें आहे कीं–"Aurangzeb has been rightly blamed for his bigoted religious policy, which was politically unwise and from the religious point, unjustified. It did much damage, it widened the gulf between the Hindu and Muslim higher classes (p. 155)

शेख अहमद सरहिंदी या कर्मठ धर्मगुरूच्या धार्मिक विचारांचा औरंगजेबावर मोठा पगडा बसला आणि त्याच्या शिकवणीला अनुसरून बादशहानें आपलें धोरण आखलें आणि राज्यावर संकटपरंपरा ओढवून घेतली. "These ideas had no little share in the downfall of the empire (p. 205) असें सांगून ताराचंदांनीं शेख अहमदाच्या शिकवणीचा फोलपणा दाखविला आहे.

अठराव्या शतकांत विशेष प्रसिद्धीस आलेला महमदीय धर्मगुरु शाह वलीउल्ला या संबंधी लेखकाचा अभिप्राय जवळ जवळ असाच आहे. "It was difficult for him to imagine that only that justice which transcended the boundaries of creeds and communities, gathered all elements of society into a harmonious whole, could generate the force which would create and sustain a society such as he dreamed of."

इस्लामी आचार-विचारांचा तौलनिक अभ्यास करणें म्हणजे मुसलमान धार्जिणेपणा असें तर आमच्या टीकाकारांना म्हणावयाचें नाहीं ना ?

## मराठ्यांच्या निंदेचा आरोपहि वृथा

पण या पुस्तकांवरील मराठी टीकाकारांचा मुख्य आक्षेप कीं आमचा मराठ्यांचा अभिमान वाटण्यासारखा इतिहास लेखकानें अगदीं विकृत स्वरूपांत दाखविला आहे ! परक्या साहेबाप्रमाणें मराठ्यांची ओळखण या ग्रंथांत केली आहे ! मराठी पत्रांत आलेली टीका वाचून एकाद्यास वाटेल कीं सारा ग्रंथ मराठी इतिहासानें भरलेला आहे पण या चारशें पानांच्या ग्रंथांत मराठ्यांबद्दल मजकूर आहे फक्त तीस पानांचा ( ४८-६१ आणि १५८-१६६ ) ! मराठी राज्याच्या उदयाला स्थानिक परिस्थिति आणि भागवतधर्माची चळवळ कारणीभूत झाली. भागवतधर्मानें मराठी समाजांत ऐक्य आणि चैतन्य निर्माण केलें. शिवाजीसारखा नामांकित पुढारी मराठ्यांना लाभला आणि त्यानें मराठ्यांचें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. शिवाजीचें शहाणपण, ध्येयवादित्व नंतरच्या राज्यकर्त्यांत राहिलें नाहीं. त्यानें आखलेलीं धोरणें आणि राज्यव्यवस्था कोसळून पडली, सरंजामशाहीची हडथड सुरू झाली, चौथाई सरदेशमुखीच्या नांवाखालीं सर्रास परप्रांतांवर स्वाऱ्या सुरू झाल्या. त्यामुळें मराठे राजपूत, जाट, बुंदेले, बंगाली, गुर्जर, कानडे, सर्वांची सहानुभूति गमावून बसले. पानिपतावर त्यांना एकहि मित्र राहिला नाहीं. आणि त्यांचा सर्वस्वी नाश झाला. आपल्या स्वार्थी धोरणानें पेशव्यांनीं नुकसान करून घेतलें. महादजी शिंदे यांनीं दिल्लीच्या पातशाहीची वजिरी पत्करली, पण त्यांतहि विशेष फायदा झाला नाहीं. मोगले, राजपूत, शीख, सर्वच त्याच्या जिवावर उठले. डी बॉईनमुळें त्याचा बचाव झाला.

## दुःखित अंतःकरणानें केलेलें सत्यकथन

१८ व्या शतकांत ना हिंदु ना मुसलमान-राजपूत, मराठे, शीख, जाट या कोणालाहि हिंदुस्थानचें ऐक्य साधतां आलें नाहीं हें सत्यकथन आहे; आणि हें सत्यकथन अत्यंत दुःखित अंतःकरणानें लेखकानें केलें आहे. त्यांत अनादराचा, द्वेषाचा भाग नाहीं. आमची भाग्यश्री आम्हाला सोडून कां गेली, आमच्या राज्यश्रीनें इंग्रजांच्या गळ्यांत कां माळ घातली, याचें निर्विकार मनानें विवेचन नको कां व्हायला ? असें आत्मनिरीक्षण जर आम्ही केलें नाहीं

तर दुसरें कोण करणार ? आम्ही सर्व हिंदी आहोंत, एकाच मातीचीं लेकरें आहोत, या लेकरांचा भविष्यकाल उज्ज्वल व्हावा म्हणून मागोसा घेऊन आमच्या चुकांची चर्चा नको का व्हावयास ? आमच्यावर अन्याय होत आहे असें अकांडतांडव करण्याचें कारण नाहीं. हिंदी राजकारणांत महाराष्ट्र आघाडीवर तळपला पाहिजे अशी इच्छा असेल तर त्याला त्याग, शौर्य, उद्योग, शहाणपण यांची जोड पाहिजे, स्वार्थीपणाला मुरड घातली पाहिजे, सहकार्य शिकलें पाहिजे, उदात्त भावनांचा विकास झाला पाहिजे. त्राग्यानें कांहीं साधणार नाहीं. मराठशाहीचीं सर्वच धोरणें तरी इतिहासकारांना कोठें मान्य आहेत ? खुद्द न्यायमूर्ति रानडे, राजवाडे, प्रो. लिमये, प्रो. पोतदार यांनीं मराठ्यांचे कितीतरी दोष दाखविले आहेत. या विद्वानांचे ग्रंथ वाचून, या महाभागांच्या पावलावर पाऊल टाकून डॉ. ताराचंद चालले आहेत. त्यांनीं कांहीं स्वकपोलकल्पित कादंबरी रचली नाहीं.

## मुख्य आरोपाचें निराकरण

ग्रंथावर मराठी टीकाकारांनीं घेतलेल्या सर्वच आक्षेपांचें उत्तर देण्यास जागा नाहीं आणि जरूरीहि नाहीं. मुख्य आक्षेपांची चर्चा करूं म्हणजे तपशील आपोआपच निकालांत निघतील. मराठी राज्याचें उदात्त ध्येय लेखकाला समजलें नाहीं, मराठी राज्याच्या प्रेरणा व धोरणें काय होतीं याचीहि त्याला जाणीव नाहीं, किंवा जाणीव असून त्याने त्याचा विपर्यास केला, हा पहिला मोठा आक्षेप. इतरहि पुढें सागूं पण याचें निरसन झालें पाहिजे.

शिवाजी महाराजांचा अंतिम हेतु काय होता, त्यांना फक्त मराठ्यांचें स्वतंत्र राज्य स्थापन करावयाचें होतें कीं मोगली सत्ता हाणून पाडून तिच्या जागीं मराठ्यांचें अधिराज्य उठवावयाचें होतें वा हिंदु राजांचा संयुक्त राष्ट्रसंघ बनवावयाचा होता ? धर्मरक्षण हें आपलें अंतिम ध्येय आहे. हें शिवाजी महाराजांनीं सुरवातीला स्पष्टपणें सांगून टाकलें. दादाजी नरस प्रभुला १६४५त त्यांनीं जें पत्र लिहिलें त्यांत स्वच्छ म्हटलें आहे कीं, ' रोहिडेश्वरानें आम्हाला यश दिलें आणि पुढेंहि तोच तुमचे आमचे हिंदवी स्वराज्याचे मनोरथ पुरे करण्यास समर्थ आहे.' याचा अर्थ सर्व भरतभूमि मुक्त करण्याचा महाराजांचा मानस होता असा मराठी इतिहासकारांनीं लावला आहे. महाराज अत्यंत धार्मिक वृत्तीचे होते. रामदासादि संतांच्या शिकवणीचा त्यांच्या मनावर खोलवर परिणाम झाला होता. मुसलमानी अमलाखाली हिंदुधर्माचा जो उच्छेद चालला होता त्याचा प्रतिकार झाला पाहिजे आणि हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे ही या संतांची शिकवणूक. हिंदुधर्माच्या रक्षणाकरतां, गोब्राह्मण प्रतिपालनाकरितां, ज्यांचा जन्म झाला तो वीरपुरुष फक्त महाराष्ट्रापुरती आपली दृष्टि केंद्रित कशी करील ?

महाराजांची युद्धनीति, राज्यकारभार, त्यांचीं धोरणें या सर्वांचा योग्य अर्थ एकच होतो की मुसलमानी अमलाचा उच्छेद करून त्या ऐवजीं हिंदु सार्वभौम राज्य–हिंदुपदपादशाही–स्थापन करावयाची हा या इतिहासकारांचा दावा; राज्याभिषेक समयीं महाराजांनीं आपलें क्षत्रियत्व आग्रहानें सिद्ध करून घेतलें तें कशा करतां तर प्राचीन कालांत क्षत्रिय राज्यकर्ते होऊन गेले, ह्या कुलांतील आपण आहोंत, एखाद्या स्थानिक पाळेगार किंवा नाईकासारखे नाहीं हें त्यांना सिद्ध करावयाचें होतें. महाराजांच्या पदव्या क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर, छत्रपति, त्यांची मोहोर, राज्यकारभारांत फार्शी ऐवजी संस्कृत शब्दप्रयोगावर भर, यावरून हिंदु अधिराज्य स्थापन करण्याचा महाराजांचा हेतु उघड दिसतो.

राज्यविस्ताराकरितां चौथाई आणि सरदेशमुखी अशीं दोन साधनें महाराजांनीं स्वीकारलीं. मराठ्यांच्या पुरतें छोटेंसें राज्य निर्माण करावयाचें असतें तर सर्व दखनचे आपण सरदेशमुख आहोत असा दावाच महाराजांनीं मांडला नसता. आणि महाराष्ट्राच्या बाहेरील मुलखांतून चौथाई वसूल करण्याचा प्रघात सुरू केला नसता. अखिल भारताचें अधिराज्य स्थापन करण्याच्या दिशेनेंच महाराजांनीं आपले प्रयत्न चालू ठेवले.

जयसिंग, जसवंतसिंग या राजपूत राजेरजवाड्यांशीं जो पत्रव्यवहार महाराजांचा झाला त्यांत धार्मिक हेतूचा स्पष्टपणें उच्चार झाला आहे. औरंगजेबाला महाराजांनीं जिझिया कर हिंदुमात्रावर लादणें अधार्मिक आहे हें बजावून सांगितलें.








आपला भाऊ व्यंकोजी यास लिहिलेल्या पत्रांत व मालोजी घोरपड्याला लिहिलेल्या पत्रांत हिंदुसत्ता प्रस्थापित करण्याची घोषणा आहे.

रामदासांनीं शिवबाला पत्र लिहिलें त्यांत हेंच सांगितलें कीं "तीर्थक्षेत्रें मोडलीं, ब्राह्मणस्थानें भ्रष्ट झालीं, धर्माचा लोप झाला, यावेळीं धर्मसंरक्षणार्थ नारायण तुमच्या ठायीं हृदस्थ झाला आणि त्यानें प्रेरणा केली."

हिंदुधर्माचा रक्षणकर्ता अशी महाराजांची कीर्ति पसरली. भूषण कवीनें याला उद्देशून म्हटलें कीं,

'राखी हिन्दुवानी हिन्दुवानको तिलक राख्यो।
अस्मृति पुरान राख्ये वेद विधी सुनी मैं।
वेद राखे विदित पुरान राखे सार युत रामनाम।
राख्यो अति रसना सुधरम्।
हिन्दुनकी चोटी राखी है रोटी सिपाहिन की।
कंधेमें जनेऊ राख्यो माला राखी गर मे।
हिन्दुवान द्रुपदी की इज्जति बचे थे।

हिंदुपदपादशाही स्थापन करावयाची हें शिवाजी महाराजांचें ध्येय होतें हें डॉ. ताराचंदाना मान्य आहे. पेशवाईंत सुद्धां याच ध्येयाचा उच्चार मराठे करीत आले. पण त्यांची कृति मात्र त्यांच्या ध्येयाला विसंगत झाली. हिंदुराज्याची संघटना करण्याऐवजी ते केवळ प्रादेशिक विस्ताराच्या मागें लागले. पेशवाईंत मराठ्यांचें ध्येय सुटलें, राजपूत, जाट, बुंदेले मराठ्यांचे मित्र बनले असते ते कट्टर शत्रु झाले.

## आणखी कांहीं आक्षेपांचा समाचार

याशिवाय दुय्यम दर्जाच्या दोन चार आक्षेपांचा उल्लेख करून हा लेख पुरा करूं.

### आक्षेप पहिला

१७५७ त अहमदशाह अबदालीने उत्तर हिंदुस्थानावर स्वारी केली, अपरंपार लूट मिळविली, कत्तली केल्या, मथुरा वृंदावन येथें रक्ताचे पाट वाढवले, पण या दुर्दैवी घटनेच्या वेळीं मराठे दिल्लीच्या रक्षणाला धावून गेले नाहींत, म्हणून डॉ. ताराचंदानी मराठ्यांना दोष दिला आहे. टीकाकारांचें म्हणणें दक्षिणेंत निझामाशी लढा चालू होता म्हणून मराठे उत्तरेंत जाऊं शकले नाहीत. वास्तविक पहातां मुख्य शत्रु म्हणून निझाम कधींच संपला होता. १७१९ मध्यें मराठ्यांना दक्षिणच्या सहा सुभ्याची चौथ सरदेशमुखी मिळाली, १७२८ मध्यें युद्ध होऊन निझामानें या खंडणीला मान्यता दिली; १७३८ च्या भोपाळच्या लढाईत पुन: त्याच्याकडून मराठ्यांनीं हें वदवून घेतलें. १७५१, १७५२, १७५६ या लढायांत निझामाचा अर्धाअधिक मुलुख घेऊन निझामाला मराठ्यांनी केवळ आपला मांडलिक बनवून सोडलें. निझामशाहींत जेमतेम धुगधूग राहिली होती. यापूर्वीच मराठी राजकारण उत्तराभिमुख झालें होतें. साम्राज्यशाहीच्या वार्ता सुरू झाल्या होत्या. १७५२ च्या तहनाम्यानें पादशाहीच्या संरक्षणाची जबाबदारी मराठ्यांनी पत्करली होती. १७५३-५५ मध्यें मराठी सैन्यें उत्तरेंत वावरत होतीं. १७५६ मध्यें राघोबाच्या आधिपत्याखालीं फौज दिल्लीकडील व्यवस्था करण्याकरतां चालली होती. होळकर, पवार, नारोशंकर, विठ्ठल शिवदेव इत्यादि शिंद्याशिवाय सर्व सरदार उत्तरेंत होते. उत्तरेंतील क्षेत्र यावेळी महत्त्वाचें होतें की दक्षिणेंतील ? ज्या प्रदेशाच्या संरक्षणाची हमी मराठ्यांनी घेतली होती तेथें धावून जावयाचें का मुर्दाड बनलेल्या निझामाच्या मुलुखांत स्वारी करावयाची ? अधिराज्य (suzerainty) पाहिजे असेल तर जबाबदाऱ्या पत्करल्या पाहिजेत आणि त्या पार पाडल्या पाहिजेत, पण राघोबा काय करतो ? गुजराथ, माळव्यांतील लहान लहान गढ्यांच्या नादी लागतो आणि इकडे मथुरा-वृंदावनासारख्या हिंदूंच्या पवित्रस्थानांची राखरांगोळी होते. बिचारे नागे संन्यासी लढून मरतात आणि आमचे राघोबा भरारी माळव्यांत राहून मजा पाहतात. अशाने काय शत्रूवर वचक बसतो ? पठाण निघून गेले. नंतर मराठ्यांचे सैन्य दिल्लीस येतें, आधीच मृतप्राय झालेल्या दिल्लीच्या प्रजेकडून पैसे काढतात. हें राजकारण, कां धोरण, कां अविचारीपणा ?

### आक्षेप दुसरा

टीकाकार म्हणतात, महमदशाहने आपली मुलगी अहमदशाह अबदालीस दिली नसून ती दुसऱ्या आलमगिराने दिली. महमदशाह या वेळेला (१७५७) जिवंत नव्हता. पण महत्त्वाचा प्रश्न कन्यादान कोणी केलें हा नसून सोळा वर्षाची कोंवळी मुलगी छत्तीस वर्षाचा धटिंगण हिरावून नेतो ही आहे. महारोग झालेल्या या माणसानें मोगल वंशांतील राजकन्या, हिरावून न्यावी यांत आमच्या टीकाकारांना चमत्का-








रिक, लांछनास्पद कांहीं दिसत नाहीं. त्यांना फक्त अहमदशाह कीं आलमगीर हा प्रश्न सुचतो.

### आक्षेप तिसरा

पानिपतच्या लढाईच्यावेळीं शुजाउद्दौला अहमदशाह अब्दालीस सामील झाला तो इस्लामच्या प्रेमानें. मराठ्यांच्या सद्हेतुबद्दल त्यास मुळीच संशय नव्हता. ताराचंदांनी म्हटलें आहे कीं अब्दाली ससैन्य जवळ आणि मराठे दूर शिवाय मराठ्यांनीं शुजाचा बाप सफरजंग यांशीं केलेला करारमदार तह पाळले नाहींत म्हणून तो मराठयांबाबत साशंक होता. आम्हांस तरी डॉ. ताराचंदांचें म्हणणें जास्त संयुक्तिक दिसतें. सफदरजंगानें मराठ्यांना दिल्लीच्या राजकारणांत आणलें, तह झाले पण वर्ष दीड वर्षाच्या आंत पैशाच्या लालचीनें वजिर सफदरजंगासारखें मोहरें सोडून मराठयांनीं गाझीउद्दिनासारख्या क्षुद्र माणसाचा पक्ष घेतला. ह्या गाझीउद्दिनच्या मूर्खपणामुळें पातशाही आणि मराठशाही या दोघांचाहि नाश झाला. या गाझीउद्दीनाचा पाठराखेपणा मराठशाहीस कसा भोवला हें कळण्याकरतां टीकाकारांनीं सरदेसाई वाचावेत.

### आक्षेप चौथा

पानपतच्या युद्धास दुष्ट नजिबानें जिहादचें स्वरूप दिलें. मराठे अगदी उच्च हेतूनें " India for Indians ", 'हिंदी लोकांच्याकरतां हिंदुस्थान' या प्रेरणेने लढले. टीकाकार बजावतात, भाऊचीं पत्रेंच हें सांगतात. मराठ्यांच्या या उदार धोरणाचा पुरस्कार आपण करीत असलों तरी दुर्दैवानें बाहेर याला अद्याप मान्यता मिळाली नाही आणि मिळण्याचा संभवहि नाहीं. घोषणा आणि कृति यांत कांहींतरी मेळ असला पाहिजे. अठराव्या शतकांत होते कोठें हिंदी लोक ? जे होते ते शीख, राजपूत, मोगले, पठाण, रोहिले, पुर्बिये, रांगडे, कानडे, मराठे इत्यादि. मराठ्यांनी चौथ वसूल करण्याच्या निमित्तानें सर्वांना दुखविलें होतें. खुद्द भाऊसाहेबांच्या बखरींत नानासाहेबांच्या तोंडी उद्गार आहेत की सर्व हिंदुस्थान अब्दाली, नजीब, शुजा, माधोसिंग जयपूरकर, बिजेसिंग मारवाडी, दुदेखान सर्व हिंदुस्थान आमच्याविरुद्ध एकत्र झालें आहे. त्यांच्या या कडक धोरणाने राजपूत, जाट, बुंदेले, रोहिले, बंगाली सर्व मराठ्यांचे शत्रू बनले होते. अब्दालीस तोंड देण्याची वेळ आली. तेव्हां मराठ्यांना आठवण झाली या हिंदी बांधवांची. भाऊंचा आक्रोश अरण्यरुदन ठरलें. उत्तरेंतील सर्व राजेरजवाडे कोणत्या पक्षाचा जय होतो याची वाट पहात बसले आणि मराठ्यांचा पाडाव होतांच सर्वांनी उठाव केला आणि मराठयांची एकच ससेहोलपट केली. 'हिंदवासियांकरता हिंदुस्थान' या धोरणाचा कां हा पुरावा ? इतिहास म्हणजे कपोलकल्पित सिद्धांताचा खेळ नव्हे, सत्यकथन आहे.

### आक्षेप पांचवा

मुलुखगिरीच्या प्रश्नावर टीकाकारानी मोठा डोलारा उभारला आहे. मराठी राज्यकर्त्यांनी चौथ सरदेशमुखी वसूल करण्याकरतां सालोसाल परप्रांतांत स्वाऱ्या पाठविल्या त्याला ते मुलुखगिरी म्हणत. सभासद बखरीत पुढील मजकूर येतो ( पान २६ ) : " दसरा होतांच छावणीहून लष्कर कूच करून जावें, मुलुखगिरीस जावें. आठ महिने बाहेर लष्करानी परमुलुखांत पोट भरावें. " ही सभासद बखर शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर लवकरच लिहिली गेली असून ती अत्यंत विश्वसनीय समजतात. ग्रँट डफने मुलुखगिरीचें स्पष्टीकरण केलें आहे तें पहा :

– ( पान ४६४ खंड १ ला १९२१ ची प्रत )

" When the Mahrattas proceeded beyond their boundary, to collect revenue and to make war were synonymous, whenever a village resisted its officers were seized and compelled by threats, and sometimes by torture, more or less sever, to come to a settlement, ready money was seldom obtained, but securities from bankers, with whom all the villages had dealings, were preferable, as they were exchanged when the garrisons of fortified places made an unsuccessful resistance they were put to the sword. On the present Moolkgeeree ( such was the name given to these expedition ), Hooly Konore was by storm etc.








या असल्या मुलुखगिरीनें कां परप्रांतांतील लोकांची मनोधारणा होणार ? याचा निषेध खुद्द इतिहासाचार्य राजवाडे यानी त्यांच्या पहिल्या खंडाच्या समग्र प्रस्तावनेंत केला आहे. १७१९ त दक्षिणचा सुभा सुटला, मराठ्यांना चौथ सरदेशमुखी मिळाली तरी वसुलाच्या स्वाऱ्या सुरू. प्रत्येक गांवांत, तालुक्यांत मराठ्यांची धाड गेली की प्रमुख अधिकाऱ्याला बोलवावयाचें त्याच्याजवळ मोठी रक्कम मागावयाची, दिल्यास ठीक नाहीतर गांव जाळून रक्कम वसूल करावयाची ही मुलुखगिरी. याचे दुष्परिणाम कसे झाले याचें वर्णन Forbes Oriental Memoirs ब्राउटनचें Letters from a Maratha Camp या ग्रंथांत वाचावयास मिळतें.

शिंदे दिल्लीला गेले हें चूक झालें कां बरोबर, भागवतधर्माची कामगिरी खरोखर काय होती, ब्राह्मण मंत्र्यांनीं संभाजीचा विद्रोह केला किंवा कसें, नाना फडणीस चिक्कू होता कां नाही, या सर्व प्रश्नांची येथ चर्चा करण्याची जरूर नाही, त्या त्या विषयावरील अधिकारी ग्रंथांत या प्रश्नांचीं उत्तरें मिळतात. अठराव्या शतकांत मराठ्यांना हिंदुस्थानचें ऐक्य साधतां आलें नाही एवढेंच लेखकाला सांगावयाचें आहे. त्याने अधिकारी ग्रंथांवर आपली मांडणी केली आहे.

महाराष्ट्रानें आतां आपल्या इतिहासाकडे केवळ आत्मकेंद्रित व आत्मनिष्ठ वृत्तीनें पाहिलें पाहिजे. भारताच्या इतिहासांत मराठ्यांचें जें स्थान आहे तें ठरविण्यासाठी राजस्थान, उत्तरप्रदेश, हैद्राबाद, बंगाल आदि राज्यांत मराठ्यासंबंधी जें साहित्य उपलब्ध झालें आहे त्याचा अभ्यास झाला पाहिजे. केवळ मराठी व इंग्रजी इतिहास ग्रंथ वा साधनें हीं त्यासाठीं अपुरीं ठरतात. अशा प्रकारचा सर्वांगीण अभ्यास करून इतिहासाच्या व सत्याच्या कसोटीवर जें उतरलें तेंच आपण कटु असलें तरी मान्य करणें श्रेयस्कर ठरेल. महाराष्ट्र हा बुद्धिवान् आहे हें सिद्ध करावयाचें असेल तर अशा उदार डोळस वृत्तीची आज सर्वांत अधिक गरज आहे.

---











अनुक्रमणिका

प्रा. र. चिं. वडवे

# सत्याग्रह व लोकशाही

सत्याग्रहाच्या आध्यात्मिक शस्त्राचा उपयोग गांधीजींनीं जरी भारतीय स्वातंत्र्य साकार करण्यासाठींच मुख्यत्वें केला असला तरी हें शस्त्र त्याहीपेक्षां व्यापक अशा क्षेत्रांत उपयुक्त होण्यासारखें आहे व वैज्ञानिक प्रगतीमुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींतून मानवी समूहाच्या भवितव्यतेचें तारूं सुरक्षित रीतीनें पैलतीरास लावण्याचें तर तें बहुधा एकमेव साधन आहे असा विचार मी नोव्हेंबर १९६० च्या अंकांतील लेखांत मांडला. गांधीजयंति निमित्तानें त्यांच्या कार्याचें रहस्य शोधावें इतकेंच उद्दिष्ट समोर ठेवून तो लेख लिहिला होता. परंतु या प्रश्नाची याहीपेक्षां अधिक चिकित्सा होणें अवश्य वाटतें. स्वातंत्र्योत्तर काळांत काँग्रेसव्यतिरिक्त इतर पक्षांनीं आपापलीं जिव्हाळ्याचीं उद्दिष्टें साध्य करण्याच्या हेतूनें जेव्हां हें शस्त्र परजण्यास व उपयोगिण्यास सुरुवात केली तेव्हां, ज्यांनीं आपली स्वातंत्र्यपूर्व काळांतील ऐन उमेदीची सर्व हयात म. गांधींच्या नेतृत्वाखालीं सत्याग्रहाच्या चळवळी चालविण्यांत खर्च केली व त्यामुळेंच जे स्वातंत्र्योत्तर काळांत आजतागायत सत्तास्थानांवर आरूढ झाले, त्यांच्यापैकींच कित्येकांनीं " लोकशाही स्वराज्यांत सत्याग्रहाला स्थान नाहीं; हवे असलेले बदल लोकशाही व घटनात्मक मार्गांनीच घडवून आणले पाहिजेत, " असं प्रतिपादण्यास सुरुवात केली. यामुळेंच या विषयाची थोडी अधिक चर्चा करून पूर्वींच्या लेखांतील विचारांस पूरक होतील असे कांहीं विचार व्यक्तविण्याचा या लेखाचा हेतु आहे.

## खुद्द गांधीजींचें उदाहरण

खुद्द गांधीजींचा अंत स्वराज्यप्राप्तीनंतर फारच थोड्या काळांत झाल्यानें लोकशाही स्वराज्यांत सत्याग्रहाचें स्थान कोणतें या बाबतींत त्यांचें प्रत्यक्ष अथवा कृतिस्वरूपीं मार्गदर्शन फारसें मिळूं शकलें नाहीं ही खरोखर खेदाची गोष्ट होय. परंतु एका प्रसंगावरून त्यांचें धोरण काय राहिल असतें याची कल्पना करतां येण्यासारखी आहे. पाकिस्तानचीं अनेकविध विपरीत धोरणें व पैसेबुडाऊ वृत्तीमुळें त्रासून जाऊन भारत सरकारनें त्याचें पचावन्न कोटी रु. देणें देण्याचें जेव्हां नाकारलें तेव्हां म. गांधींनीं प्राणान्तिक उपोषण सुरू केलें व त्या दडपणानें सरकारनें तें देणें देऊन टाकलें (व यामुळेंच चीड येऊन श्री. गोडसे यांनीं गांधीजींना गोळ्या घातल्या ) हें प्रसिद्ध आहे. उपोषण हा सत्याग्रहाचाच एक आविष्कार असल्यानें या प्रसंगावरून स्वराज्यांतहि सत्याग्रह करण्यास खुद्द गांधींनी हरकत घेतली नसती असें समजण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. परंतु अशा प्रकारें केवळ शब्दप्रामाण्यावर विसंबून रहाण्याऐवजीं या प्रश्नाचा वस्तुनिष्ठपणें अभ्यास करणें अधिक श्रेयस्कर होईल.

## लोकशाहींतील सत्याग्रहाचा हक्क

आपल्या देशावर आतां कोणा परकीयांचें राज्य राहिलें नसून आपलें आपण हवें तें करण्यास मोकळे आहोत. म्हणजेच या देशांत आतां स्वराज्य आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. परंतु येथें लोकशाही चालू आहे कीं नाहीं हें मात्र जरा अधिक कसोशीनें पहावयास हवें. लोकशाहीचा पुरेपूर व शब्दशः अर्थ म्हणजे सार्वजनिक स्वरूपाच्या प्रत्येक प्रश्नाबाबत आमजनतेच्या मताप्रमाणें अथवा निदान बहुमतानें निर्णय करून तो कार्यवाहींत आणणें हा होय. या अर्थाची लोकशाही फक्त लहानलहान नगरराज्यें ( city states ) असतील तरच शक्य आहे. परंतु अशीं राज्यें आतां पृथ्वीवर बहुतेक कोठेंहि नाहींत म्हणून हा अर्थ सोडून देऊं. आधुनिक काळांत लोकशाही हा शब्दप्रयोग राष्ट्रांच्या संदर्भांत करण्यांत येतो व कोट्यवधी लोकवस्ती असलेल्या राष्ट्रांतील प्रत्येक बाबतींत सर्व जनतेचें मत घेऊन राज्य चालविणें अशक्य असल्यानें प्रातिनिधिक लोकशाहीची कल्पना उदयास आली. व ती लवकरच थोड्याफार फरकानें सर्वत्र पसरूं लागली.

या प्रकारच्या लोकशाहींत अनेक उणीवा आहेत. परंतु त्यांचा विचार बाजूस सारून येथें इतकेंच म्हणणें पुरें होईल कीं किमान पुढील दोन शर्ती पुऱ्या झाल्या तरच ही लोकशाही खरीखुरी लोकमतानुवर्ती होईल : ( १ ) राज्यतंत्राचें प्रातिनिधिक स्वरूप (form) निश्चित करणारी लिखित वा अलिखित घटना आणि ( २ ) तें

तंत्र चालविणारी मंडळी व सामान्य जनता यांची लोकशाहीसंबंधीची व्यापक अव्यभिचारी जीवनानिष्ठा. या दोन्ही शर्तींचें शब्दशः व कृतिशः (in letter & spirit) पालन होत असेल तर राष्ट्रांत शासनाच्या हातून लोकमताच्या विरुद्ध असे गंभीर स्वरूपाचे प्रमाद सहसा घडणार नाहींत व एखाद्या प्रसंगीं घडण्याचा संभव उत्पन्न झालाच तर तो टाळण्याचा अथवा दुरुस्त करून घेण्याचा घटनात्मक मार्ग उपलब्ध राहील व प्रमाद करणारेहि त्यापुढें मान तुकवितील. स्वाभाविकच सत्याग्रहाचा अवलंब करण्याची पाळीच जनतेवर बहुधा येणार नाहीं. कोणत्याहि अन्यायास अथवा आक्रमणास तोंड फोडून त्याचें परिमार्जन करून घेण्याचा राजमार्ग सर्वांना खुला असल्यावर मुद्दाम कटकटी उत्पन्न करून समाजजीवन विस्कळित करण्याची हौस कोणाला असणार ? अशा प्रकारच्या लोकशाहींत अन्याय अथवा आक्रमण होणारच नाहीं अशी १००% निश्चिती नसल्यानें लोकांना सत्याग्रहाचा अधिकारच नसावा असें ठासून म्हणणें तत्त्वतः कठीण आहे. परंतु कोणी तसें म्हटलें तर तें समजण्यासारखें आहे. परंतु जेथें लोकशाही यापेक्षां पातळ स्वरूपाची आहे तेथें लोकांना सत्याग्रहाचा अधिकार नाकारणें याचा अर्थच समजूं शकत नाहीं. कारण सत्याग्रहाच्या मलभूत हेतूविषयींच त्यायोगें अज्ञान प्रगट होतें.

## एक शर्त पूर्ण, दुसरी अपूर्ण

आतां आपल्या देशांत उपर्युक्त शर्ती पुऱ्या करणारें राज्ययंत्र आहे कीं नाहीं या प्रश्नाकडे वळूं. आपली राज्यघटना योग्य मार्गानें संमत होऊन कार्यान्वित झालेली आहे व तींत ठरविल्याप्रमाणें विधिमंडळें, न्यायालयें व सरकारें स्थापन झालेलीं आहेत. विधिमंडळाच्या निवडणुका व न्यायाधीशांच्या नेमणुका बहुतांशीं आक्षपरहित होत आहेत व विधिमडळांतील बहुमतवाल्या पक्षांचीं सामुदायिक जबाबदारीचीं मंत्रिमंडळेंहि स्थापन होत असतात. राज्यघटनेंतील कलमें एकंदरीनें लोकशाहीस साजेशींच आहेत. यामुळें जरी किरकोळ कांहीं मतभेदाच्या बाबी कोणी दाखवून देऊं शकलें तरी एकंदरीनें राज्ययंत्राच्या स्वरूपाबद्दलची पहिली शर्त पुरी झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या राज्ययंत्रद्वारा गेल्या दहाबारा वर्षांत जो कारभार चालू आहे तो पहातां लोकशाहीची दुसरीहि शर्त पुरी झाली आहे असें प्रतिपादणें मात्र अतिशय कठीण वाटतें. घटनेच्या कलमांवर बोट ठेवून हा कारभार चाललेला दिसत असला तरी कांहीं अत्यंत जिव्हाळ्याच्या व महत्त्वाच्या बाबतींत तो खरोखर लोकमतानुवर्ती आहे कीं काय याबद्दल जबर शंका येण्यासारखे अनेक प्रसंग या काळांत घडलेले दिसून येतात. या सर्वच प्रसंगांची येथें दखल घेण्याची जरुरी नाहीं. कांहीं थोडेसे ठळक प्रसंग पाहिले तरीहि ही गोष्ट सहज लक्षांत येऊं शकेल.

## राज्यपुनर्घटनेंतील धरसोड

राज्यपुनर्रचनेचें उदाहरण पहा. या प्रश्नाबाबत सध्यांच्या सत्ताधाऱ्यांना कांहीं निश्चित व सैद्धान्तिक मतें आहेत कीं नाहीं हा खरोखर एक संशोधनाचा विषय होईल. स्वातंत्र्यपूर्व काळांत अनेक वर्षें त्यांनीं सुसंगतपणें भाषावार रचनेचा पाठपुरावा केला परंतु स्वातंत्र्यानंतर सत्ता हातीं आल्याबरोबर कांहीं गूढ स्वरूपाच्या कारणाखातर त्याची कार्यवाही करण्याचें टाळलें. बरें त्यांना हा सिद्धान्त अमान्य होता असें म्हणावें तर श्रीरामुलूंचें बलिदान व त्यानंतर आंध्रात झालेले दंगेधोपे व जाळपोळ यांचें दडपण आल्याबरोबर अगदीं एक आठवड्यांत त्यांनीं स्वतंत्र आंध्र स्थापण्याचा निर्णय घेतला व विशेष अचंब्याची गोष्ट अशी कीं हा निर्णय श्रीरामुलूंच्या बलिदानानें घेण्यांत आलेला नसून तत्त्व पटल्यामुळें घेतला अशी घोषणा केली ! तत्त्व पटलें तर त्याची बजावणी सर्वत्र कां करीत नाहीं या आक्षेपास उत्तर देण्याच्या भानगडींतच ते पडले नाहींत ! नंतर पुन्हां चोहोंकडून दडपण आल्यावर राज्यपुनर्रचना मंडळ नेमलें व त्या मंडळाच्या कित्येक शिफारसी कोणत्याहि एका सिद्धान्तावर आधारित नसतांहि व त्यांविरुद्ध लोकमत प्रक्षुब्ध असतांहि त्याला मान्यता दिली. महाराष्ट्र व गुजराथ यांच्या पुरतेंच बोलावयाचें तर येथें राज्यकर्त्यांच्या अनिश्चयाचा व लोकशाही विरोधी धोरणाचा अगदी कळस झाला. अनेक नवनवीन सूत्रांना (formula) अनुक्रमें मान्यता व अमान्यता दर्शवीत शेवटीं द्विभाषी राज्य स्थापन केलें, या सर्व भानगडींत खऱ्या



अनुक्रमणिका






लोकमताचा आदर कितपत झाला हें राज्यकर्तेच जाणोत. नंतर सार्वत्रिक निवडणुका होऊन पश्चिम महाराष्ट्रांत बहुतेक सर्वत्र व गुजराथत मोक्याच्या ठिकाणीं पराभव मिळाल्यानंतर तरी लोकमत अगदी घटनात्मक मार्गांनीं स्पष्ट झालें होतें कीं नाहीं ? मग त्याचा तरी आदर कोठें झाला ? बहुभाषी राज्येंच उत्तम अशी त्यांची धारणा होती म्हणावें तर उर्वरित भारतांत तशीं राज्यें कां बनविलीं नाहींत ? हेंहि एकवेळ असो. निवडणुकीनंतर चार वर्षांनीं द्विभाषी मोडण्याचा निर्णय कां केला ? संयुक्त महाराष्ट्र समितीनें मुंबई वेढण्याची केलेली घोषणा व पुढील निवडणुकींत महाराष्ट्र आपल्या पक्षाच्या हातून जाईल अशी खात्री यामुळेंच ना ? याचा स्पष्टार्थ इतकाच कीं द्विभाषी घडवितांना वा मोडतांना लोकशाही सिद्धान्तापेक्षां दडपण व पक्षीय स्वार्थ याचा प्रभाव त्यांच्यावर अधिक पडला. बरें द्विभाषी मोडल्यावर तरी कृतींत कांहीं सुसंगतपणा राखावा कीं नाहीं ? पण नाहीं. सीमा प्रश्न तसाच लोंबकळत ठेवला. तेथेंहि घटनात्मक व इतर सर्व मार्गांनीं लोकमत स्वच्छपणें व्यक्त झालेलें आहे. परंतु लक्षांत कोण घेतो ?

**बेरुवाडीचा प्रसंग**

पश्चिम बंगालच्या बेरुवाडी विभागाबाबतहि असाच अनुभव आला. देश म्हणजे जणुं आपली खाजगी मालमत्ता अशा थाटांत संबंधी लोकांना न विचारतां[१] हा भाग पाकिस्तानला देण्याचें ठरविण्यांत आलें न यासाठीं संसदेच्याहि संमतीची गरज नाहीं असें सांगण्यांत येऊं लागलें. पुढें कोर्टाकडून थप्पड मिळाल्यानंतर प्रश्न संसदेपुढें ठेवण्यांत आला. प. बंगालच्या आम जनतेनें व काँग्रेस सरकारनेंहि आपला प्रदेश दुसऱ्या देशास देऊन टाकण्यास जेव्हां तीव्र विरोध दर्शविला तेव्हां असें सांगण्यांत आलें कीं राज्यसरकारचें मत घटनेप्रमाणें केंद्रावर बंधनकारक नाहीं ! कांटेकोरपणें कदाचित् नसेलहि परंतु त्यांत लोकशाही मूल्यें पायदळीं तुडविलीं जातात त्याचें काय ?

लहान सहान बाबतींतहि हाच मामला अनेक वेळां दिसून यतो. प्रतिबंधक स्थानबद्धतेचा निर्बंध लोकशाही मूल्यास विरोधी असतांहि त्याची मुदत या ना त्या सबबीवर वाढविली जात आहे. सरकारी अधिकारी स्वतःला जनतेचे सेवक न समजतां मालक म्हणून समजूनच वागत आहेत ! शांतता व सुव्यवस्था यांच्या नांवाखालीं अद्यापहि एखाद्या अल्पसंख्याक जमातीस कांहींहि कारण नसतां ( अथवा निवडणुकीच्या डावपेचांच्या दृष्टीनें ) झुकतें माप देऊन 'कायद्यापुढें समता' या सिद्धान्तास हरताळ फासला जातो, इतकेंच नव्हे तर न्यायालयीन निर्णयहि बाजूस टाकले जातात. देशसेवेसाठीं स्वातंत्र्यपूर्व कालांत सर्वस्व वेचलेल्यांना सध्यांच्या कठीण अवस्थेंत मदत करण्याच्या कामांतहि स्वपक्षाबाहेरील कार्यकर्त्यांकडे उपेक्षेनें पाहिलें जातें. कोणतीहि समिती अथवा मंडळ नेमण्याचा प्रसंग उद्भवल्यास लायकीपेक्षां स्वपक्षीयांचीच वर्णी अधिक लावण्यांत येते. उत्पादकांनीं वा व्यापाऱ्यांनीं एखाद्या जीवनावश्यक वस्तूची कोंडी केल्यास त्यांचें पारिपत्य करण्याऐवजीं जनतेलाच 'भात थोडा खा', 'करंज्या तिखटमिठाच्या करा' असा उपदेश करण्यांत येतो ! 'अहिंसामूर्ति गांधीजींचे आम्ही वारस आहोंत' असें म्हणत म्हणतच जनतेवर लाठीहल्ले व गोळीबार करण्यांत येतात, इतके कीं स्वातंत्र्यपूर्व कालापेक्षां स्वातंत्र्योत्तर कालांत गोळीबाराचें प्रमाण वाढलें आहे असा इशारा देण्याची पाळी खुद्द राष्ट्रपतींवर आली ! या व अशा सर्व घटनांवरून सत्ताधाऱ्यांची लोकशाही विषयींची निष्ठा व्यक्त होते असें त्यांना स्वतःला तरी प्रामाणिकपणें म्हणतां येईल कां ? थोडक्यांत म्हणजे लोकशाहीची दुसरी शर्त आपल्या देशांत पुरी झालेली नाहीं.

**राज्यकर्त्यांची लोकशाहीनिष्ठा अव्यभिचारी नाहीं**

याचा अर्थ असा नव्हे कीं राज्यकर्ते लोकशाहीस सर्वस्वी वंचित झाले आहेत किंवा त्यांच्या कृतींत स्तुत्य वा अभिनंदनीय असें कांहींहि नाहीं. आहे, जरूर आहे. परंतु त्याची यादी करणें हा या लेखाचा विषय नाहीं.

१. आम्हांला न विचारतां बेरुबाडी विभाग पाकिस्तानला देण्याचें केंद्रानें ठरविलें म्हणून बंगाल विधिमंडळांत केंद्रावर सरकारसुद्धां सर्व पक्षांनीं कडक टीका केली. उलट संसदेत पं. नेहरूंनीं आवर्जून सांगितलें कीं, हा निर्णय बंगालला विचारूनच केला ! !








त्यांच्या हेतूबद्दलहि अवाजवी शंका आमच्या मनांत नाहीं. परंतु चांगल्याला चांगलें म्हणतांना वाईटालाहि चांगलें म्हणावें अथवा त्याकडे दुर्लक्ष करावें अशी अपेक्षा बाळगणें इष्ट नाहीं. त्यामुळें देशहानीच होईल हें लक्षांत ठेवावयास हवें. शिवाय आपला मुख्य प्रश्न असा आहे कीं अन्याय व आक्रमणाच्या प्रतिकारार्थ सत्याग्रहाच्या मार्गानें जाणें लोकशाहींत इष्ट आहे कीं नाहीं ? वरील बानगीदाखल दिलेल्या उदाहरणांवरून अन्याय, आक्रमणें व लोकमतविरोधी कृत्यें राज्यकर्त्यांच्या हातून घडत आहेत म्हणजेच त्यांची लोकशाही विषयींची निष्ठा अव्यभिचारी नाहीं हें स्पष्ट दिसतें व म्हणून लोकशाहींत सुद्धां सत्याग्रहास स्थान आहे हें निर्विवाद ठरतें. हें स्थान नसावें असें म्हणणाऱ्यांना लोकशाहीची चाड तरी कमी असते अथवा सत्ताधाऱ्यांच्या हातून चूक होणेंच शक्य नाहीं अशी सोयीची समजूत तरी ते आपल्याशीं बाळगून असतात यांत शंका नाहीं. आणखी थोडें खोलांत जाऊन विचार केल्यास असें आढळून येईल कीं राष्ट्रीय धोरणें ठरविण्याबाबत विचारांची अपरिपक्वता व अनिश्चय, पक्षैकदृष्टि व पक्षांतील अंतर्गत लाथाळीस लगाम घालण्याची असमर्थता, स्वातंत्र्य संग्रामांतील राष्ट्रीय सभेच्या कार्यामुळें उत्पन्न झालेला अहंगंड व तज्जन्य वाचाळता इ. कारणांमुळेंहि सत्याग्रहशस्त्राचा अधिक्षेप करण्याची वृत्ति बळावत आहे. या शस्त्रावर पडदा पडला कीं आपलीं लोकशाही विरोधी कृत्येंहि झांकून जातील असेंच या लोकांना जणुं वाटत असावें. परंतु अशा-प्रकारें कोंबडा झांकला तरी सूर्य उगवण्याचा थोडाच थांबणार आहे ?

## विरोधी पक्षसंघटना दुर्घट

देशांतील जनतेची सेवा करणें व तिच्या हक्कांसंबंधीं अव्याहतपणें झगडत राहणें हें उज्ज्वल स्वरूपाचें कार्य सतत पाऊणशें वर्षेपर्यंत करीत असलेल्या संस्थेंतून पुढें आलेल्या व व्यक्तिशः त्याच कार्याप्रीत्यर्थ अतुल स्वार्थ-त्याग केलेल्या नेत्यांतूनच सध्यांचे राज्यकर्ते उदयास आले असतांना त्यांच्या हातून अशीं लोकमतविरोधी कृत्यें कशीं घडूं शकतात हें पहाणेंहि उद्बोधक होईल. स्वातंत्र्यपूर्व कालांत स्वातंत्र्यप्राप्ती हें एकमेव उद्दिष्ट डोळ्यापुढें होतें. जनतेची सर्व शक्ति या कार्यावर केंद्रीभूत होण्यासाठीं सर्व देशांत साम्राज्यविरोधी लढा देणारा एकमेव पक्ष असणें अगत्याचें आहे हें मत अखिल भारतीय जनतेंत खोलवर रुजविण्यासाठीं कॉंग्रेसनें शक्य ते सर्व उपाय व प्रचाराचीं साधनें पुरेपूर उपयोगिलीं. इतर कोणतेहि पक्ष जरा डोकें वर काढूं लागलेसे दिसतांच त्यांच्यावर राष्ट्रद्रोहीपणाचें शिक्कामोर्तब करण्याचा पायंडा देशांत सुरू झाला. यामुळें इतर पक्षांचीं पाळेंमुळें जनतेंत रुजणेंच त्यावेळीं शक्य झालें नाहीं. एक तपाच्या स्वातंत्र्य काळांतहि या परिस्थितींत फरक पडूं शकला नाहीं. सध्यांच्या राजवटीवर कोणी फारसे संतुष्ट आहे असें नाहीं. उलट बहुतेक जण या ना त्या कारणास्तव बोटेंच मोडतांना दिसतात. तरीहि निवडणुकींत इतर पक्षांना आशा धरण्यासारखी परिस्थिति मात्र उत्पन्न होणें कठीण होऊन बसलें आहे. यामुळें सध्यांची राजवट बदलून सत्ता प्रभावीपणानें हातीं घेऊं शकेल असा विरोधी पक्ष लवकर स्थापन होणें दुरापास्त झालें आहे. स्वाभाविकपणेंच ‘ निर्वीरमुर्वीतलम् ’ अशा थाटांत सत्ताधारी वागत आहेत व प्रमाद करीत आहेत.

## विभूतिपूजेचा अतिरेक

दुसर असें कीं आपल्या देशांत विभूतिपूजेची प्रवृत्ति फार मोठ्या प्रमाणांत असल्यानें स्वातंत्र्यसंग्रामांत पुढाकारानें भाग घेतलेल्यांना जनता अगदीं अक्षरशः डोक्यावर घेऊन नाचत असे. ते म्हणतील तें ब्रह्मवाक्य व त्याविरुद्ध ब्रहि उच्चारणें हें जणुं राष्ट्रीय पाप ठरलें. ते बोलतील तच लोकमत असें जणूं समीकरणच अस्तित्वांत आलें. स्वातंत्र्यानंतरहि बहुतांशीं हेंच समीकरण आजतागायत चालूं आहे. खरें पाहतां लोकशाही जमान्यांत ही परिस्थिती पालटावयास हवी; लोकांच्या खऱ्या मतांचें प्रतिबिंब राज्ययंत्रांत दिसावयास हवें. परंतु आलेला वारसा अद्यापि तरी बदललेला नाहीं व कांहीं सत्ताधारी पुढाऱ्यांचें मत म्हणजेच लोकमत असा जमाना चालूं आहे. तिसरें असें कीं, सत्याग्रहाविषयीं खुद्द म. गांधींचा दृष्टिकोन कांहींहि असला तरी त्यांच्या बहुसंख्य अनुयायांनीं सशस्त्र क्रांतीच्या अशक्यतेच्या जाणीवेमुळेंच केवळ सत्य अहिंसात्मक क्रांतीचा आश्रय केला. या साधनाच्या पाठीशीं केवढें मोठें तत्त्व अनुस्यूत आहे याचा विचार करण्याच्या भानगडींत त्यांच्यापैकीं फारसें कोणी पडलेंच नाहीं. यामुळें स्वराज्य मिळविण्याचें प्राप्त परिस्थितींतील साधन इतकच सत्याग्रहाचें

महत्त्व त्यांच्या लक्षांत राहिलें. स्वाभाविकपणेंच स्वराज्य-प्राप्तीनंतर तें शस्त्र म्यान करून ठेवावें, त्याचा उपयोग करण्याचे दिवस संपले असें मानण्याची वृत्ति त्यांच्यांत दृढमूल झाली.

वरील मीमांसेवरून इतिहास कसा घडत जातो, आधी-च्या ऐतिहासिक पार्श्वभूमींतून नंतरच्या इतिहासास कसें वळण लागतें व यामुळें देशाचें भवितव्य घडविण्याचीं सूत्रें हातीं घेणाऱ्यांनीं प्रत्येक पाऊल अगदीं डोळ्यांत तेल घालून पूर्ण विचाराअंतीं टाकणें किती महत्त्वाचें आहे हें लक्षांत येईल. पक्षीय राजकारण जरूर करावें व पक्षाच्या हिताहिताचा विचार सतत नजरेसमोर जरूर बाळगावा. परंतु हें करतांना पक्षाच्या कोणत्याहि कृतीमुळें देशाच्या सार्वत्रिक राजकारणांत वा जीवनांत राष्ट्रहिताच्या दृष्टीनें कोणतीहि विकृति उत्पन्न होणार नाही अथवा अनिष्ट प्रथा पडणार नाहीं याचीहि कसोशीनें काळजी घ्यावी; नहून पक्षीय स्वार्थाखातर लोकहिताचा अथवा देशहिताचा बळी देण्याचें पाप जाणतां अजाणतां हातून घडेल. हें पाप मुद्दाम कोणी करतो असें नसलें तरी त्यांचीं फळें मात्र अटळ असतात यांत शंका नाहीं.

## धोक्याची सूचना

आतां दोनतीन मुद्यांचें स्पष्टीकरण करून हा लेख आटोपता घेऊं. नुसत्या स्वरूपतः ( Form )नव्हे तर अर्थतः ( Spirit ) खऱ्याखुऱ्या लोकशाहींत सत्याग्रहाचें शस्त्र जनतेच्या हातीं असणें अवश्य असलें तरी त्याचा उपयोग करण्याची वेळ सहसा येणार नाहीं व म्हणून या एकमेव अर्थानें तें शस्त्र म्यान करण्याची भाषा बोलणें कदाचित् क्षम्य ठरेल. परंतु अशी काटें-कोर लोकशाही आपल्या देशांतच काय परंतु इतरत्रहि अगदीं थोड्याच देशांत उपलब्ध आहे. म्हणून जनतेनें, विशेषतः भारतीय जनतेनें, म. गांधींनीं दिलेला हा ठेवा गमावूं नये. लोकशाहींत सत्याग्रहाला स्थान आहे, या दृष्टीनें अवश्य स्थान आहे; असें या लेखाचें प्रतिपादन आहे. परंतु याचबरोबर एक धोक्याची सूचनाहि देणें अगत्याचें आहे. ती सूचना अशी कीं सत्याग्रह, विशेषतः व्यापक स्वरूपाचा सत्याग्रह, हा एक प्रकारें लहानमोठ्या क्रांतीचाच प्रयत्न असल्यानें त्यापासून समाजजीवनाला सुरुंग लागून तें विस्कळित होण्याचा अथवा समाजां-तील शिस्तीला तडा जाण्याचा संभव असतो. तसेंच त्यामुळें जनता व राज्यकर्ते यांचें लक्ष राष्ट्रपुनर्रचने-वरून विचलित होऊन त्यापेक्षां कमी दर्जाच्या प्रश्नांवर केंद्रित होण्याचीहि शक्यता असते. देशाच्या सर्वांगीण प्रगतीच्या दृष्टीनें हे परिणाम शक्यतों टाळणें अवश्य असल्यानें या शस्त्राचा उपयोग अगदी मर्यादित प्रमाणांत व अटळ वाटला तरच व तोहि जबाबदारीनें करण्याचें पथ्य सर्वांनीं कसोशीनें पाळण्यास हवें. नहून त्याची धार बोथट होऊन तें निरुपयोगी अथवा हास्यास्पद बनल्याशिवाय रहाणार नाहीं. हें समाज-धुरीणांनीं व शस्त्राचा उठसूठ वापर करणाऱ्यांनीं सदैव लक्षांत बाळगलें पाहिजे. लोकमत संघटित करून तद्द्वारा घटनात्मक मार्गांनीं आपल्याला इष्ट ते बदल घडवून आणणें हाच सर्वोत्तम मार्ग होय याविषयीं आमच्या मनांत संदेह नाहीं. या मार्गानें यश येणें शक्य नाहीं असें नक्की झाल्यानंतरच सत्याग्रहाचा मार्ग इष्ट ठरेल.

दुसरें असें कीं सत्याग्रहाचा हक्क स्वराज्यांतील जनतेस नाहीं असें म्हणणाऱ्यांनीं एक महत्त्वाची गोष्ट नजरेआड होऊं देऊं नये. ती म्हणजे कोणत्याहि प्रकाऱच्या अन्यायाचें वा आक्रमणाचें परिमार्जन वैध वा घटनात्मक मार्गानें होण्यासारखें नाहीं असें वाटल्यावर जनता तो अन्याय अथवा तें आक्रमण सहन करीत दिवस कंठील ही समजूत अतिशय भ्रामक आहे. अन्यायाचा वा आक्रमणाचा प्रतिकार करणें हा मानवी स्वभावाचा एक स्वाभाविक घटक असल्यानें त्याची गणना मूलभूत हक्कांतच केली पाहिजे. हा प्रतिकार शांततामय वा वैध मार्गांनीं शक्य नाहीं असें निश्चित वाटलें तर अवैध व हिंसात्मक मार्गाचा अवलंब जनते-कडून होण्याचा सदैव संभव असतो व त्यायोगें समाज-जीवन उध्वस्त होण्याचा धोका असतो. हें जर टाळणें असेल तर जनतेचा सत्याग्रहाचा हक्क मान्य करणें हेंच योग्य होईल.

शेवटची विनंति अशी कीं कोणतीहि व्यक्ति, संस्था, अथवा प्रचलित ज्वलंत प्रश्न, याविषयीं अनुकूल वा प्रतिकूल मत व्यक्त करणें हा या लेखाचा हेतू नाहीं. लोकशाहीच्या मूल्यावर घासून पहातां काय निष्पन्न होतें इतकेंच स्पष्ट करण्यासाठीं त्यांचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. म्हणून यापेक्षां अधिक अर्थ त्यांतून कोणीहि काढूं नये.







श्री. श्री. शं. नवरे

# भारतांतील पोर्तुगीज वसाहतींचा अंत

सोमवार दि. १८ डिसेंबरच्या मध्यरात्रीपासून सुमारें ४८ तासांच्या आंत भारतांतील पोर्तुगीज वसाहतींचें उच्चाटन करण्याचें काम पूर्ण करण्यांत आलें. सुमारे साडेचारशें वर्षें भारतीय जीवनास मुकलेल्या या पश्चिम किनाऱ्यावरील छोट्या प्रदेशाची भारताच्या राजकीय, सामाजिक आणि आर्थिक जीवनाशीं एकरूपता घडवून आणण्याची प्रक्रिया लागलीच सुरू झाली.

केंद्र सरकारच्या आधिपत्याखाली मुल्की शासकाच्या मदतीनें मेजर जनरल के. पी. कँडेथ गोव्याचे लष्करी राज्यपाल म्हणून तूर्त कारभार पहाणार आहेत. दीव आणि दमण या गुजरातमधील माजी पोर्तुगीज वसाहतींच्या कारभारासाठीं असेच स्वतंत्र अधिकारी नेमण्यांत आलेले आहेत. दमणपासून जरा तुटक असलेला दादरा-नगर हवेलीचा भाग पोर्तुगालचें वर्चस्व झुगारून देऊन १९५४ सालींच स्वतंत्र झाला आणि त्यानें भारतीय शासनाचें संरक्षण मागितलें. भारतानें हें संरक्षण दिलें. पोर्तुगालनें जागतिक न्यायालयाकडे दाद मागून दादरा-नगर हवेलीच्या रक्षणासाठीं भारतीय हद्दींतून आपलें सैन्य नेण्याचा आपला हक्क प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्याला यश आलें नाहीं. दादरा-नगर हवेलीच्या लोकांनीं पोर्तुगालचें राजकीय वर्चस्व स्वेच्छेनें आणि निर्धारपूर्वक झुगारून दिलेलें असल्यामुळें पुनः त्या जोकडाखालीं जाण्यास ते नाखूष होते. भारताच्या पार्लमेंटनें हा भाग चालू वर्षीं भारतीय शासनाखालीं सामील करून घेतला. आणि त्याच्या प्रतिनिधीला लोकसभेंत स्थान दिलें. दीव, दमण आणि गोवा या भागांनाहि लवकरच हा हक्क मिळेल.

पाँडेचरी, चंद्रनगर, यानाम, कारिकल आणि माहे या फ्रेंच वसाहती भारतांत सामील करून घेतांना तेथील जनतेला भारत सरकारनें दिलेलें आश्वासन साडेचारशें वर्षें पोर्तुगीज संस्कृतींत वाढलेल्या जनतेलाहि देण्यांत आलें. तें हें कीं परकीय संस्कृतीमुळें प्राप्त झालेल्या जीवनवैशिष्ट्यांत ढवळाढवळ करण्याचा प्रयत्न भारत-सरकारकडून करण्यात येणार नाहीं. आपापल्या समजुतीप्रमाणें आचाराचें स्वातंत्र्य प्रत्येकाला राहील. भारताच्या घटनेनें व्यक्तिमात्राचें धार्मिक स्वातंत्र्य आधींच मान्य केलेलें आहे. त्याचा लाभ या नवागतांना देखील आतां मिळत जाईल.

## पाण्यांत पाणी मिसळलें

पोतुगालची राजकीय विचारप्रणाली भारताहून भिन्न होती व अजूनहि आहे. अर्थात् घटनेमध्यें नमूद केलेल्या भारतीय विचारप्रणालीशीं एकरूप होणें या नवागतांना देखील आवडेल. त्याप्रमाणें भारताच्या सामाजिक आणि आर्थिक व्यवहाराशीं आपला सांधा जोडून घेणें त्यांना अपरिहार्य वाटेल. गोमतकांतील राजकीय खांदेपालट विशेष उत्पातावांचून झालेला असल्यामुळें आणि तेथील जनतेनें पालटाचें हार्दिक स्वागत केलेलें असल्यामुळें बंधारा फुटतांच पाण्यांत पाणी मिसळून जावें त्याप्रमाणें माजी पोर्तुगीज वसाहतींतील हे लोक भारतीय जीवनाशीं समरस होण्यास फारसा अवधि लागणार नाहीं हें अगदीं निश्चित. पाण्यांत राहून माशाशीं वैर करण्यासारखी आतांपर्यंतची अनैसर्गिक परिस्थिति पुष्कळांना असह्य झालेली होती.

आयाती–निर्यातीवरील निर्बंध, जकात, प्राप्तीवरील कर, इ. कांहीं आर्थिक बाबतींत नवागतांपैकीं कांहीं लोकांना नवीन राजवट कदाचित् गैरसोयीची वाटेल. पण व्यापक दृष्टीनें त्याच्या शतपट फायदे त्यांच्या पदरांत पडणार आहेत, हें थोड्या विचारांतीं त्यांच्या लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

## स्पर्धेतून वसाहतींचा जन्म

मध्ययुगाच्या कालानंतर भारतांत सर्वांत आधीं वसाहत करण्यासाठीं आलेले लोक सर्वांचे मागून चालते होत आहेत नव्हे, त्यांना चालतें व्हावें लागलें आहे.

'नवीन जगा'चा शोध घेण्याच्या ईर्ष्येनें पंधराव्या सोळाव्या शतकांत युरोपांतील धाडसी दर्यावर्दी लोक अमेरिकेकडे आणि आशियाकडे वाट काढीत चालले डच, पोर्तुगीज आणि स्पॅनिश लोक आघाडीवर होते. फ्रेंच आणि इंग्लिश लोक यांनीं नंतर लागलीच त्यांचा मागोवा घेतला. या स्पर्धेतून भारतांतील परक्या वसाहतींचा जन्म झाला. डचांनीं व्यापारानिमित्त इकडे वखारी घातल्या पण राज्यसंपादनाचा उद्योग त्यांनीं केला नाहीं. भारताच्या पूर्वेस पॅसिफिकच्या बाजूला त्यांचा तो बेत सिद्धीस गेला. स्पॅनिश लोकांनीं दक्षिण अमेरिकेकडेच आपलें लक्ष विशेष केंद्रित केलें. साम्राज्यविस्ताराचे बाबतींत स्पेन आणि पोर्तुगाल यांचेमध्यें प्रारंभीं विशेष चुरस लागली. नवीन जगाची त्यांनीं आपसांत वाटणी करून घेतली ! पोर्तुगीजांना पुढें फ्रेंच आणि इंग्रज हे जबरदस्त प्रतिस्पर्धी भेटल्यामुळें प्रारंभीं मिळालेल्या यशावरच त्यांना संतुष्ट राहावें लागलें. पण पुढें हिंदुस्थानांतील राजकीय परिस्थितीचा फायदा घेऊन येथें राज्यसंपादन करण्याच्या बाबतींत फ्रेंच आणि इंग्रज यांचेमध्यें तीव्र स्पर्धा लागली. त्यांत इंग्रजांनीं फ्रेंचांवर मात करून पूर्वी कधीं झालें नव्हतें एवढें एकछत्री राज्य अखिल भारतांत स्थापन केलें आणि शतक तें दीड शतक निःसंपत्नरीत्या उपभोगिलें ! ब्रिटिशांच्या मानानें क्षुद्रातिक्षुद्र दिसणाऱ्या पोतुगीजांच्या व फ्रेंचांच्या वसाहती भारताच्या पश्चिम व पूर्व किनाऱ्यालगत जीव धरून राहिल्या.

## हिंदी स्वातंत्र्याचा लढा

अर्थात् भारतीय जनतेला स्वातंत्र्याचा पहिला आणि मुख्य लढा इंग्रजांविरुद्धच अत्यंत त्यागानें आणि चिकाटीनें वर्षानुवर्षें करावा लागला. जगभर पसरलेल्या बलाढ्य ब्रिटिश साम्राज्यसत्तेबरोबर एकाकी आणि निःशस्त्र लढा देणें भारतीय जनतेच्या शक्तीबाहेरचें काम होऊन बसलें. पण म. गांधींच्या अनत्याचारी असहकाराच्या मात्रेनें एकीकडे जनतेमध्यें अभूतपूर्व जागृति, संघटना, आणि आत्मविश्वास हीं निर्माण केलीं; त्याप्रमाणें दुसरीकडे ब्रिटिश सत्तेची जनमनांतील प्रतिष्ठा कमी केली. लागोपाठ झालेल्या दोन महायुद्धांनीं जागतिक परिस्थितीच्या अनुकूलतेची त्याला जोड दिली. त्यामुळें साक्षात् युद्धाचा प्रसंग न आणतांच ब्रिटिशांनीं येथून ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं पाय काढला आणि हिंदी स्वातंत्र्याच्या दुंदुभि वाजल्या.

## स्वातंत्र्यांतील अपूर्णता

पण मोठ्यांत मोठी अति प्रचंड ब्रिटिश वसाहत झाली तरी पोर्तुगीज आणि फ्रेंच वसाहतींचे विषारी व्रण भारताचे शरिरावर दिसत आहेत तोंपर्यंत भारताच्या स्वातंत्र्याला पूर्णता येऊं शकत नाहीं, याची जाणीव भारतांतील नेत्यांना होण्यास विलंब लागला नाहीं. विषारी व्रणाची बाधा सर्व शरिराला होते त्याप्रमाणें भारताच्या भूमीवरील परक्या वसाहतींचे ठिपके भारतीय स्वातंत्र्याच्या सुरक्षिततेला धोका देणारे होते, हें सगळ्यांना समजून चुकलेलें होतें, नव्हे खुद्द म. गांधींनीं तसें उघडपणें बोलून दाखविलेलें होतें.

ब्रिटिशांना हाकलून लावणाऱ्या भारतीय जनतेला प्रधानमल्लनिबर्हण न्यायानें फ्रेंचांना आणि पोर्तुगीजांना भारतांतील त्यांच्या त्यांच्या वसाहतींतून हाकलून लावणें अशक्य होतें अशांतला भाग नाहीं. पण तसें करतांना भारतानें अंगीकारलेलें आणि जगभर प्रचारिलेलें एक महत्त्वाचें पथ्य पाळावयाचें होतें, तें हें कीं, परस्पर समजुतीच्या आणि शांततेच्या मार्गानें या प्रश्नांचा निकाल लावावा, त्यासाठीं युद्धाच्या हातघाईचा प्रसंग येऊं देऊं नये. म्हणून भारताचें सरकार नवीन स्वतंत्र कारभाराची मांडामांड सुरू करण्याच्या प्रारंभींच हळूहळू त्या उद्योगाला लागलें. पण साम्राज्यसत्तेवर सहजगत्या आणि सुखासुखी पाणी सोडण्यास तयार होण्याइतकें जग साधूंचें आणि संतांचें झालें आहे थोडेंच ? जगांत स्वातंत्र्याचा, समतेचा आणि बंधुत्वाचा पहिला जोरानें उद्घोष करणाऱ्या फ्रान्सनें किती आढेवेढे घेतले असतील त्याची 'इंडोचीन'च्या प्रकरणावरून आणि अद्यापि वर्षानुवर्षें धुमसत असलेल्या अल्जेरिया युद्धकांडावरून कल्पना करतां येण्यासारखी आहे. तथापि 'होय' 'नाही' करतां करतां शेवटीं उभय सरकारांमध्यें समझोता होऊन भारतांतील फ्रेंच वसाहतींचा कारभार ता. १ नोव्हेंबर १९५४ रोजीं भारत सरकारनें आपलेकडे घेतला. पुढें सार्वमताचा कौल मिळून ता. २८ मे १९५६ रोजीं झालेल्या तहनाम्यान्वयें हीच घटना सशास्त्र करण्यांत आली आणि ब्रिटिशांप्रमाणें भारतांतील फ्रेंच सत्ता संपुष्टांत आली.








या सत्तेच्या आधीन भारतांतील सुमारें दोनशे चौरस मैलांचा व साडे तीन लाख लोकवस्तीचा मुलुख होता.

## पोर्तुगालला विवेक सुचला नाहीं.

पण मनाच्या नसलें तरी जनाच्या लज्जेस्तव फ्रान्सला इतक्या उशिरां सुचलेला सुविचार पोर्तुगालला कधींच सुचला नाहीं ! दोन्ही देशांच्या राजवटींमधील हा फरक असावा असेंहि म्हणतां येत नाहीं. वसाहतींना साम्राज्यतृष्णेचा डाग लागलेला असतो म्हणून पहिल्या व दुसऱ्या महायुद्धानंतर राजकीय कोशामध्यें 'वसाहत' शब्द इतका बदनाम झालेला आहे कीं आपल्याशीं त्याचें नातें कबूल करण्याची पुष्कळ राज्यकर्त्यांना लाज वाटूं लागली आहे. लोभाविष्ट साम्राज्यवाद्यांनीं 'वसाहत' या शब्दाला असा नवा अर्थ चिकटविण्याचा खटाटोप चालविला कीं या वसाहती नसून आमच्या मुख्य राज्याचा हा अंगभूत भाग होय ! पोर्तुगालनें तर १९५१ सालीं त्या अर्थाचा कायदाच करून टाकला ! असें सोंग घेण्यांत आणखी एक सोय अपेक्षित असते ती ही कीं अंगभूत भाग म्हटलें म्हणजे संयुक्त राष्ट्रांच्या पंचायतीला वसाहतवादाच्या नांवाखालीं कोणत्याहि देशाच्या अंतर्गत कारभारांत हात घालतां येणार नाहीं. युनोच्या घटनेंतील विशिष्ट कलमाचा चिलखतासारखा उपयोग करून घेण्याचा, म्हणजेच आपलीं साम्राज्यविषयक पापें झांकण्याचा, बड्या राष्ट्रांचा हा प्रयत्न होय. पोर्तुगालनें त्याच युक्तिवादाचा आश्रय करून भारताच्या गोव्याविषयीं मागणीला भुस्कटासारखें उडवून लावलें ! आणि म्हणूनच एरवीं सीधा आणि साधा दिसणारा हा मामला वर्षानुवर्षें कुचंबत, घोळत आणि चिघळत राहिला !

## भारताकडून झालेले प्रयत्न

भारत सरकारनें गोमंतकाबाबत आपल्या जगजाहीर ब्रीदाला जागून जेवढे प्रयत्न करणें शक्य आहे तेवढे करून पाहिले. 'युनो'च्या चव्हाट्यापर्यंत हा वाद पोंचला. पण 'युनो'ची उपयुक्तता पटत असूनहि त्या जागतिक संघटनेचा आतांपर्यंतचा अनुभव फारसा उत्तेजक नाहीं. आशेपेक्षां निराशेकडेच पारडें झुकतें ! 'युनो'च्या सनदेंतील तत्त्वें आणि बड्या राष्ट्रांच्या आकांक्षा व स्वार्थ यांचा मेळ बसतां बसत नाहीं. वसाहतींतील जनतेच्या भावना 'युनो'पर्यंत पोंचूं शकत नाहींत आणि कदाचित् महत्प्रयासानें पोंचल्या तरी 'युनो'चीं सूत्रें हलविणारीं बडीं राष्ट्रें सहानुभूतीपूर्वक त्या समजावून घेण्याच्या मनःस्थितीमध्यें नसतात ! गोमंतकांतील प्रजेच्या स्वातंत्र्याचा प्रश्न निघतांच पोर्तुगालनें ब्रिटिशांशीं झालेल्या करारमदाराकडे बोट दाखविणें म्हणजे तिसऱ्याचें घर लुटतांना एका चोरानें दुसऱ्या चोराची साक्ष उभी करण्यासारखें होतें ! स्वयंनिर्णयाच्या तत्वानुसार पोर्तुगीज वसाहतींतील बिचाऱ्या प्रजेला कोणी विचारीना ! आपल्या आकांक्षा उघडपणें बोलून दाखविण्याची तिला चोरी ! परकी सत्तेविरुद्ध एकादा आवाज उठण्याचा अवकाश, दंडुक्यानें तो चिरडून टाकण्यांत येई. बरें, सरकार आपणहून करील या अपेक्षेनें मूग गिळून बसावें तर 'प्रजा आमच्या कारभारावर खूष आहे' असा डांगोरा पिटून आत्मवंचना आणि परवचना करण्याची राज्यकर्त्यांची तयारी ! संख्येनें प्रजा इतकी थोडी कीं आधुनिक शस्त्रास्त्रांनिशीं सज्ज असलेल्या एवढ्या मोठ्या साम्राज्यसत्तेशीं झगडा देण्याइतकी ताकद तिच्यामध्यें कोठून असणार ? त्यांतूनहि स्वातंत्र्याची नैसर्गिक लालसा मधूनमधून इतकी अनिवार होते कीं असेल तें धैर्य आणि बळ एकवटून ती माणसाला आत्मार्पण करायला लावते, उघड्या डोळ्यांनीं आगीच्या खाईंत उडी घेण्यास प्रवृत्त करते. त्याप्रमाणें गोमंतकांत स्वातंत्र्यप्राप्तीकरितां अनेक उठाव झाले, लहानमोठीं बंडें झालीं. पण त्या सर्व प्रयत्नांना पाशवी साम्राज्यसत्तेपुढें हार खावी लागली. इतिहासकालांत गोमंतक मुक्तीसाठीं मराठ्यांनीं केलेले तुरळक प्रयत्न त्यांच्या इतर अवधानांमुळें शेवटापर्यंत पोंचू शकले नाहींत. अगदीं अलीकडच्या काळांत कॉंग्रेसनें ब्रिटिश हिंदुस्थानापुरतीच आपली मर्यादा आंखून घेतली. मनांतील हेतु हा कीं मोठ्या शत्रूचा एकदां निकाल लावल्यावर छोटे शत्रू आपसुक पळून जातील किंवा त्यांना पळवून लावायला मग फार प्रयास पडणार नाहींत. पण यांपैकीं पहिला आडाखा चुकला आणि दुसऱ्याच्या मार्गानें भारतान स्वतः स्वीकारलेलीं आणि अट्टाहासानें उपदेशिलेलीं आंतरराष्ट्रीय नीतीचीं बंधनें आडवीं आलीं. हीं बंधनें कसोशीनें पाळण्यासाठींच ६।७ वर्षांपूर्वी भारतांतून गोमंतकाच्या दिशेनें झालेल्या सत्याग्रहाला किंवा निःशस्त्र प्रतिकाराला नेहरूसरकारनें कसलाहि पाठिंबा दिला नाहीं, उलट आपल्या सत्ते-





अनुक्रमणिका

पणाची निर्विवाद ग्वाही देण्यासाठीं त्या प्रयत्नांत अडथळे मात्र उभे केले ! ! दुसऱ्या बाजूने पोर्तुगीजांनीं मात्र दडपशाहीचें गिरमिट लावून दहशतीचें वातावरण निर्माण करतांना कशाची दिक्कत बाळगली नाहीं ! भारतानें त्याग्यानें गोव्यांतील आपली वकीलात बंद केली तरी त्याचा 'नैतिक' परिणाम कितीसा होणार ! आर्थिक बहिष्काराचें हत्यारहि निरुपयोगी ठरलें. कारण त्यामुळें आपलेंच नुकसान आणि गोव्यांतील आमच्याच लोकांचे हाल होऊं लागले. भारतानें आपला दरवाजा बंद केला तरी पोर्तुगालला दुसऱ्या सर्व दिशा मोकळ्या होत्या. आणि दुसरें असें कीं केवळ भारताच्या दुःस्वासामुळें पाकिस्ताननें पोर्तुगालला पोटाशीं धरलें !

## जागतिक परिस्थितीचा हवाला

तरीहि भारतसरकारनें आशा सोडली नाही. जागतिक परिस्थितीच्या अनुकूलतेची तें वाट पहात बसलें. खुद्द पोर्तुगालचा हृदयपालट होण्याची आशा नष्ट झालेली होती. पण बड्या राष्ट्रांच्या किंवा जागतिक परिस्थितीच्या दडपणानें पोर्तुगालमधील ताठर सालाझारशाहीला वांकावेंच लागेल असा विश्वास भारताला परवांपरवांपर्यंत वाटत होता. गेल्या चारपांच वर्षांत आफ्रिकेंतील गुलाम राष्ट्रांनीं एकामागून एक केलेला यशस्वी उठाव हा विश्वास अधिकाधिक दृढ करीत चाललेला होता. विझून चाललेल्या आशेच्या ठिणग्या पुनः फुलूं लागल्या. कसल्या तरी अंतर्ज्ञानानें नेहरू छातीठोकपणें सांगूं लागले कीं गोमंतकाचें स्वातंत्र्य हा आतां अगदीं थोड्या कालावधीचा प्रश्न आहे. आफ्रिकेंतील आंगोला वसाहतींत पोर्तुगालनें निर्माण केलेल्या यमपुरींतच त्याच्या साम्राज्यवादाचें मरण सांठवलें जात आहे. प्रतिज्ञा केल्याप्रमाणें सामोचारानें, शांततेच्या मार्गानें, गोवास्वातंत्र्याचा प्रश्न सुटेलच सुटेल. लोकांनीं थोडा धीर धरावा. सत्याग्रहाच्या गोष्टी करूं नयेत. सैन्यानिशीं स्वारी करण्याचें तर नांवहि नको !

## सात्विक भूमिकेचें विडंबन !

भारतसरकारच्या या सात्विक भूमिकेची तिकडे पोर्तुगालमध्यें काय प्रतिक्रिया झाली पहा ! त्याला तींत भारताचा कमकुवतपणा दिसला ! सत्याग्रहाचा प्रयत्न आपण झोडपून काढला आणि सशस्त्र स्वारी न करण्याला भारत बांधलेलें आहे. तसाच प्रसंग आला तर आपल्या पाठीशीं 'नाटो' सज्ज आहे. 'युनो' च्या सुरक्षा समितीचा आणि आम सभेचा-असे दुहेरी तिहेरी खंदक आपलें संरक्षण करण्यास पूर्ण समर्थ आहेत. इतकीं वर्षें आपण साम्राज्याचा गाडा हाकीत आणलाच कीं नाहीं ? मग यापुढें आपला हात धरणारा कोण आहे ? गोवा यावच्चंद्रदिवाकरौ आपलेंच रहाणार. कोऽन्योस्ति सदृशो मया ?

## नेहरूंवर आगपाखड

या दुर्योधनी दुराग्रहाचा परिणाम नेहरूंच्या मनावर झाल्यावांचून राहिला नाहीं. चौदा वर्षें तितिक्षापूर्वक अज्ञातवास स्वीकारून पांडवांना शेवटीं हक्कसंरक्षणासाठीं शस्त्र घेऊन रणांगणांत उतरावें लागलेंच. नेहरूंनीं तशींच चौदा वर्षें साम्राज्यवाद्यांची समजूत घालण्यांत, शांततेच्या मार्गानें त्यांचा हृदयपालट घडवून आणण्यांत, बड्या बड्या राष्ट्रांची सहानुभूति मिळविण्यांत, म्हणंजेच शिष्टाई करण्यांत, खर्चीं घातलीं आणि शेवटीं हे सर्व प्रयत्न विफल ठरल्यावर हातांत शस्त्र उचललें ! पोर्तुगीज वसाहतींवर भारतीय सैन्य लोटून दिलें. नाविक, वैमानिक आणि भौमिक असें तिरंगी सामर्थ्य प्रकट केलें. ही वार्ता कानीं पडल्याबरोबर कोणी ओरडलें- "गांधीवादाचा आज पराभव झाला !" तिकडे पाश्चात्य राष्ट्रांमधून 'अब्रह्मण्यम्' 'अब्रह्मण्यम्' अशी एकच आरोळी उठली ! कोणी शांततेची जपमाळ ओढणाऱ्या नेहरूंवर भोंदूपणाचा आरोप केला; कोणी म्हणाले, नेहरूंचें परोपदेशे पांडित्य उघडें पडलें; तर कोणी म्हणाले, नेहरूंनीं 'युनो' संघटनेच्या गळ्याला नख लावून तिचा मृत्यु जवळ आणला ! अशा रीतीनें गोवा मोहिमेच्या निमित्तानें भारताच्या राजकीय धोरणावर, म्हणजेच पर्यायानें नेहरूंवर, आंतून आणि बाहेरून दुहेरी मारा सुरू झाला !! गोव्यांतील पोर्तुगीजांनीं जवळ जवळ मुळींच प्रतिकार केला नाहीं. त्यांच्यापेक्षां असल्या शाब्दिक टीकेचा माराच अधिक ! !

## टीकेंतील अवास्तवता

पण या दोन्ही प्रकारच्या टीका वस्तुतः अवास्तव आणि अनाठायीं नव्हेत काय? खुद्द गांधींनीं आपल्या हयातींत आपल्या अहिंसात्मक तत्वाचा पराभव कबूल केलेला नव्हता काय? काश्मीर संरक्षणार्थ भारताचें सैन्य पाठविलें गेलें आणि प्रत्यक्ष लढलें तें गांधीजी हयात असतांना. गांधींच्या शिकवणीची साक्ष ठेऊन स्वतंत्र भारताचा कारभार करीत असतांनाच निजामावरील पोलीस कारवाई सिद्धीस नेण्यांत आली. 'युनो'नें जेव्हां जेव्हां भारतीय सैन्याची मागणी केली तेव्हां तेव्हां आंतरराष्ट्रीय शांततेसाठीं तें पाठविण्यांत आलें. हें सैन्य पाठवितांना न्यायान्यायाचा भारतानें अर्थातच विचार केलेला होता. स्वतःला गांधीवादी म्हणविणारें भारताचें काँग्रेस सरकार लष्करी आणि पोलीस खात्यांवर दरसाल कोट्यवधि रुपयांचा खर्च करीत आहे तो प्राप्त परिस्थितींत गांधीवादाच्या मर्यादा ओळखूनच. तत्व आणि व्यवहार यांची सांगड घालतांना तत्वाला पुष्कळ वेळां मुरड घालून अन्यायाचें परिमार्जन करावें लागतें.

## ढोंगी टीकाकार

आणि दुटप्पीपणांत मुरब्बी ठरलेल्या पाश्चात्य राष्ट्रांनीं नेहरूंवर तुटून पडावें, यासारखा दुसरा ढोंगीपणा कोणता? वसाहतीची राजनीतिशास्त्रांत जी व्याख्या करण्यांत आलेली आहे ती भारतांतील पोर्तुगीज प्रदेशांना तंतोतंत लागू पडण्यासारखी नाहीं, असें म्हणण्याचें धाडस–किंवा निर्लज्जपणा-आतांपर्यंत एकाहि पाश्चात्य राष्ट्रानें केलेलें नाहीं ही गोष्ट सत्य आहे. वसाहतवादाचे दिवस आतां राहिलेले नाहींत, हें अप्रत्यक्षरीत्या पुष्कळांना कबूल करावें लागलेलें आहे. पण केवळ स्वार्थामुळें आपल्या उक्तीला कृतीचें स्वरूप देण्याला बहुतेकांनीं दिरंगाई केली. गुन्हेगारांच्या बाजारांत कोण कोणाला दोष देणार? आणि रक्तानें भरलेल्या हातानें दुसऱ्याचे कान उपटण्याचें धाडस कोण करणार? या गुन्हेगारांचे गुन्हे शेंकड्यांनीं मोजतां येण्यासारखे असले तरी निवडक तीन चार ठळक आणि ताज्या उदाहरणांवर बोट ठेऊन नाकानें कांदे सोलणाऱ्या या लोकांना विचारतां येईल कीं क्यूबावरील मोहीम आठवण बुजण्याइतकी शिळी झालेली आहे काय? आल्जेरियांत वर्षानुवर्षे रणकंदन चाललें आहे तें कशासाठीं? आणि युनोचे निर्णय धाब्यावर बसवून कटांगांत कारस्थानें करणारे लोक 'युनो'ची काय प्रतिष्ठा वाढवित आहेत! 'गोवा मोहिमेचा हात आवरा' असें नेहरूंना आवर्जून सांगणाऱ्या लोकांनीं वसाहतवादाचा पुरस्कार करणाऱ्या पोर्तुगालला एका शब्दानें तरी समजुतीच्या गोष्टी सांगितल्या आहेत काय? करड्या पोर्तुगीज अमलाखालीं गोव्यांतील जनता अगदीं त्रस्त झालेली होती म्हणून तिनेंच उठाव केला आणि विमोचनासाठीं धावून येणाऱ्या भारतीय सैन्याचें हार्दिक स्वागत केलें, याची साक्ष परदेशी वृत्तपत्रांच्या वार्ताहरांनींच देऊन आपल्या देशांकडून नेहरूंवर होणारा गहजब परस्पर खोटा ठरविला, त्यामुळें या विषयावर अधिक लिहिण्याचें कारण उरलेलें नाहीं. चोरानें शिरजोर व्हावें त्याप्रमाणें पोर्तुगालनें भारतीय नागरिकांवर गोळ्या झाडून आणि भारताच्या प्रदेशावर आक्रमण करून आगळिक केली तेव्हां भारताच्या सहनशक्तीची मर्यादा संपली. या आगळिकीचें समाधानकारक उत्तर मिळेना तेव्हां अगदीं उघडपणें, जवळ जवळ जाहिराती लावून, भारतानें आपलें सैन्य पोर्तुगीज वसाहतींच्या दाराशीं आणून उभें केलें आणि पोर्तुगाल नमण्याचें कांहींएक चिन्ह दिसेना तेव्हां आंत घुसून त्रस्त प्रजेला मुक्त केलें. पोर्तुगीज गव्हर्नर जनरलशीं आणि युद्धकैद्यांशीं भारताचें उदात्त आणि उदार वर्तन हीच त्याच्या उच्च संस्कृतीची खूण नव्हे काय? त्याच्या उलट गोव्याचा सूड पोर्तुगालनें आपल्या दुसऱ्या वसाहतींत हजारों हिंदी लोकांना कैदेंत टाकून त्यांची मालमत्ता जप्त केली आहे!

युनोच्या सुरक्षा मंडळांत आणि आम सभेंत भारताचा निषेध करण्याचा डाव बारगळला, यावरूनच पाश्चात्य राष्ट्रांनीं काय तो बोध घ्यावा.

सुमारें दीड हजार चौरस मैलांचा आणि साडे सहा लाख लोकांचा नवीन प्रदेश प्रविष्ट करून घेतांना भारताचे अंगावर फारतर मूठभर मांस चढलें असें म्हणतां येईल. त्यामुळें भारताचा लष्करी वाढणार नाहीं हें उघड आहे. खरें महत्त्व आहे तें भारताच्या भूमीवरून परकीय वसाहतींचें उच्चाटन झालें आणि भारताची सुरक्षितता वाढली या गोष्टीला. सोळाव्या शतकाच्या प्रारंभीं गोव्याला आणि त्यानंतर थोड्याच










वर्षांनीं दमण आणि दीव येथें पाय रोवून बसल्यावर पोर्तुगीजांनीं धर्माचे नांवाखालीं अनन्वित अत्याचार केले त्यांची आज आठवण होणें अपरिहार्य असलें तरी ज्याचा शेवट गोड तें सर्व गोड असें म्हणून भविष्य-कालाकडे पाहिलें पाहिजे.

गोमंतकाच्या मुक्तीनें भारतांतील पोर्तुगीज वसाह-तींचें उच्चाटन झालेलें असलें तरी अन्यत्र— विशेषतः आफ्रिकेंत पोर्तुगीज वसाहती जीव धरून बसलेल्या आहेत. गोव्याचें उदाहरण ऐकून त्यांना स्फूर्ति आल्या-वाचून रहाणार नाहीं.

---

## विचारधनाचा संग्रह

" एकच भाषा आपल्याला लागणारे सर्व विचार पुरवूं शकणार नाहीं. अनेक भाषांच्या उतारपेठांत जाऊन विचारधनाचा संग्रह आपणांस करावा लागेल. या विचारधनाचा संग्रह करीत असतां स्वकीय, परकीय असा भेदभाव कामीं येणार नाहीं. मराठी भाषा आपली म्हणून तिच्यावर आपली भक्ति असावी हें सर्वथा युक्त होय. पण तेवढीच आपली असें समजून दुसऱ्या भाषांचा तिरस्कार करणें ही नीति विचारपरिपोषणाला बाधक आहे. मराठी हें आपलें घर आहे आणि इतर सर्व भाषा आपला ' बाजार ' आहेत. या बाजारांतून विविध प्रकारचें ज्ञान आणून तें आपल्या घरांत साठविलें पाहिजे. उत्तम संसार करण्याची सर्व शहाण्यांची हीच रीत आहे. "

— महामहोपाध्याय द. वा. पोतदार.
( दीक्षान्त भाषण )

## लेखकांना विनंति

( १ ) ' नवभारत ' मासिकासाठीं पाठवावयाचे लेख कागदाच्या एकाच बाजूवर शाईनें सुवाच्य लिहावे.

( २ ) लेखाची पोंच ताबडतोब देण्यांत येऊन त्यासंबंधी निकाल सामान्यतः एक महिन्यांत कळविण्यांत येईल. न स्वीकारलेला लेख परत करण्यासाठीं अवश्य तो टपालखर्च पाठवावा.

( ३ ) लेखाची मर्यादा सामान्यतः ४००० शब्दां-हून अधिक नसावी. अनेक अंकांतून लेखांक देण्यापेक्षां विशिष्ट मुद्यावर स्वतंत्र लेख लिहिणें बरें.

( ४ ) आशयाला बाध न आणतां लेखाची मर्यादा कमी करण्याचा अधिकार संपादकमंडळाला राहील.

( ५ ) लेखाबद्दल अल्पस्वल्प मोबदला देण्याचें संपादकमंडळानें ठरविलें आहे.

( ६ ) अभिप्रायासाठीं पाठवावयाच्या पुस्तकांच्या दोन प्रती येणें लवकर अभिप्राय देण्याचे दृष्टीनें अधिक सोईचें पडतें.

( ७ ) लेख, संपादकासाठीं इतर कांहीं मजकूर व अभिप्रायासाठीं पुस्तकें कार्यकारी संपादकांचे पत्त्यावर मुंबईस पाठविणें.



अनुक्रमणिका

श्री. एस्. ए. कुलकर्णी

# गुरुदेव टागोरांचें उद्‌बोधक जीवन [ पूर्वार्ध ]

When death comes and whispers to me
" Thy days are ended "
Let me say to him, " I have lived in love
" And not in mere time "
He will ask " will thy songs remain ? "
I shall say " I know not, but this I
know that often when I sang
I found my eternity "

अशा मनोहर शब्दांत आपल्या काव्याचें वर्णन करणाऱ्या कविराज गुरुदेव रविंद्रनाथ टागोरांचें जीवन म्हणजे कित्येक जन्म अत्यंत परिश्रमानें व काळजीपूर्वक अभ्यासावा असा एक अनमोल ग्रंथराज आहे. आपलें काव्य आपल्यानंतर जिवंत राहील किंवा नाही याची त्यांना बिलकूल क्षिति नव्हती; ते जेव्हा आपलें काव्य गात तेव्हा त्याना आपल्या चिरकालीन शाश्वत जीवनाचा आनंद उपभोगावयास मिळत होता– यांतच आदर्श कवीच्या सन्माननीय ध्येयाची गुंफण आहे. गुरुदेवांचें जीवन केवळ शाश्वतच होतें कां ? छे ! ते शाश्वत जीवनाचें प्रतीक होतें ! आणि त्यांचें काव्य ? त्यांच्या काव्यांत 'शाश्वत' शब्दाला अर्थपूर्ण केलें असेंच कोणीहि म्हणेल. बर्नाड शॉ सारख्या सुविख्यात साहित्यिकाने त्यांचा गौरव " king of poets " या शब्दांत केला होता, तें कांही उगीच नाहीं !

## अंतापर्यंत सरस्वतीसेवा

गुरुदेवानी आपलें लेखनकाय वयाच्या १४ व्या वर्षी आरंभिलें आणि देहत्यागापूर्वी आठ दिवसांपर्यंत त्यांची काव्यरचना सुरूच होती. वयाच्या मानाने त्यांचें शरीर थकत गेलें आणि हातांत लेखणी धरणेंदेखील त्यांना कठीण झालें; तथापि त्यांच्या मनाला कधीच थकवा आला नाही. शेवटी शेवटी तर त्यानी आपलें काव्य लिहवून घेतलें; परंतु देवी सरस्वतीच्या सेवेंत खंड पडूं दिला नाहीं. शेवटच्या आजारांत त्यांना विश्रांती मिळावी म्हणून शुश्रूषा करणाऱ्यांनी त्यांना बिछान्यावरून उठण्याची मनाई केली. हालचाल न करतां पडून राहणें त्यांना कधींच आवडत नसे. परंतु यावेळीं त्याना बिछान्यांत झोपून राहणें भाग पडलें; त्यांचे डोळे मिटलेले असत; पण त्यांच्या पायांची हालचाल बिछान्यांत सुरूच असे. डॉक्टरनी यावरहि जेव्हां बंधन घातलें तेव्हां ते म्हणाले, टीक आहे ! आतां मी फक्त विचारच करीत राहीन. तुम्ही माझ्या शरीरावर बंधनें लादाल; माझ्या मनावर तर नाहीं ! " अशाहि परिस्थितींत गुरुदेवानी आपली अखेरची काव्यरचना केली. तें काव्य म्हणजे मृत्यूशीं केलेलें संभाषण होतें जणूं ! ते म्हणाले,

Though men call him furtile
"in the depth of his heart he finds
truth
washed clean by the inner
light.

Nothing can cheat him ;
he carries to his treasure-house
his last reward.

केवढी तपस्या ! केवढी निष्ठा ! केवढा दुर्दम्य आशावाद ! गुरुदेवानी तीन लाखाहून अधिक काव्यपंक्तींची रचना केली. काव्याबरोबरच कादंबरी, नाटय, लघुकथा, लघुनिबंध, वगैरे विविध साहित्यक्षेत्रांत त्यांची लेखणी तितक्याच दिमाखाने वावरत होती. जगाच्या कोनाकोपऱ्यांत हिंडून त्यानीं शेंकडों विद्वत्ताप्रचुर वक्तव्यें केलीं; नाट्यरचनेबरोबरच नाट्य-अभिनयांतहि ते सारखेच निष्णात होते. चित्रकला, संगीतकला आदीनाहि त्यानी आत्मसात् केलेलें होतें.

## साहित्यिकाचा पिंड

गुरुदेवांना अत्यंत थोर मातापित्यांचा वारसा लाभलेला होता. त्यांचे वडील देवेंद्रनाथ 'महर्षि' पदाला पाहोंचलेले होते. त्यानी बोलपूर येथें २० बिघे जमीन विकत घेतली होती — गुरुदेव रविंद्रनाथांच्या विश्वभारती व शांतिनिकेतनचा पसारा येथेंच आहे. जणुं

काय आपल्या दिग्विजयी पुत्राच्या कर्मभूमीचा पायाच वडिलांनी घालून दिला होता! गुरुदेवांनी आपली पहिली कविता वयाच्या १४ व्या वर्षी लिहिली (१८७५) ती 'अमृतबझार पत्रिकें'त २५ फेब्रुवारीच्या अंकांत प्रसिद्ध झाली; आणि ती त्यांनीं हिंदु मेळाव्यांत गाऊनहि दाखविली. बालपणीं संस्कृत, बंगाली, इंग्रजी वाङ्मयाचा त्यांनीं भरपूर अभ्यास केला. जन्मजात साहित्यिकाचा त्यांचा पिंड अभिजात साहित्याच्या अभ्यासाने अतिशय झपाट्याने सव्यसाची बनत गेला. १८८१ मध्यें ते कायद्याचा अभ्यास करण्यासाठीं इंग्लंडकडे निघाले; परंतु साहित्यिक मन कायद्याच्या चाकोरींत सांपडण्यास तयार झालें नाहीं. ते तसेच परतले आणि त्यांनी आपली पहिली कादंबरी 'बौथकुरानीर हाट' (The Young Queen's Market) लिहावयास घेतली. १८८२ मध्यें त्यांनीं 'संध्या गीत' प्रसिद्ध केलें. तें इतकें उत्कृष्ट झालें कीं त्यावेळचे एक थोर साहित्यिक श्री. रमेशचंद्र दत्त यानी आपल्या एका स्वागतप्रसंगीं रविंद्रांचें 'संध्यागीत' ऐकून, हर्षभरित होऊन आपल्या गळयांतील हार रविंद्रांच्या गळयांत घातला. पाठोपाठ 'प्रभात संगीत' रविंद्रांच्या प्रभावी लेखणींतून उतरलें. याच सुमारास 'बंगाली साहित्य अकॅडमी'ची स्थापना झाली, त्यांत गुरुदेवांचे प्रयत्नच मुख्यत्वें समाविष्ट होते. १८८३ मध्यें त्यांचा मृणालिनीदेवीशी विवाह झाला. गंमत ही कीं विवाह झाल्याबरोबर 'प्रकृतीर प्रतिशोध' (संन्याशी) हें काव्यनाट्य त्यानी प्रसिद्ध केलें. त्यांच्या तारुण्याचा जोष अशा प्रकारें अध्यात्मवादांत डुंबत होता. पुढल्याच वर्षीं (१८८४) त्यानी 'हातेकलमे' (Theory and Practice) हा आपला प्रबंध वाचून दाखविला. या प्रबंधांत त्यानी देशांतील राजकीय लढ्यावर आपलीं ज्वलंत मतें निर्भीडपणें व्यक्त केलीं. अस्सल साहित्यक्षेत्रांत वावरत असतांहि त्यानी देशांतल्या स्वातंत्र्य-लढ्याशीं पाठ फिरविली होती असें नाहीं.

## समाजक्रांतीचे विचार

१८८५ मध्यें 'बालक' या तरुण पिढीच्या मासिकाची जिम्मेदारी गुरुदेवानी आपल्या शिरावर घेतली. या मासिकामधून त्यांची 'राजर्षी' ही कादंबरी, 'मुकुट' ही कथा, लघुनिबंध, शब्दचित्रें, राम मोहन रॉय यांचें चरित्र वगैरे बरेचसें साहित्य प्रसिद्ध झालें. १८८६ मध्यें त्यांचे वडील आजारी पडले, म्हणून त्यांच्या शुश्रूषेसाठी ते मुंबईला आले; याच वर्षी त्यांच्या पहिल्या कन्येचा जन्म झाला. एकीकडे कौटुंबिक आपत्ती तर एकीकडे नवा नवा आनंद या मिश्र जीवनक्रमांत गुरुदेवांचें लक्ष एका वेगळया संघर्षाकडे वेधलें होतें. धर्म, रूढी, समाजविषयक विविध प्रश्नावर ते 'संजीवनी' साप्ताहिकांतून चौफेर टोलेबाजी करीत सुटलेले होते. अखिल भारतीय कॉंग्रेसच्या परिषदेच्या निमित्तानें 'मातृभूच्या हांकेला साथ' हें स्वागतपद्य त्यानी रचलें व म्हणून दाखविलें. 'हिंदु विवाह पद्धतीचें सार' हा गहजब माजविणारा लेख त्यानी याच वेळीं लिहिला.

१८९० मध्यें गुरुदेवानी कालिदासाच्या 'मेघदूताचा अनुवाद करून आपल्या कीर्तींत भर घातली. याच वर्षी इंग्लंडला अडीच महिन्यांच्या दौऱ्यावर ते जाऊन आले. परत आल्यावर त्यांना आपल्या इस्टेटीची देखभाल करण्याची कामगिरी हाताळावी लागली. त्या वर्षी अखिल भारतीय कॉंग्रेसचें अधिवेशन फिरोजशहा मेहता यांच्या अध्यक्षतेखाली कलकत्यास भरलें; त्यांत उद्घाटनाच्या वेळीं गुरुदेवानी 'वंदे मातरम्' गीत म्हटलें. आपल्या इस्टेटीच्या देखरेखीनिमित्त हिंडतांना गुरुदेवांचा संबंध शेतकरी समाजाशीं बराच आला. धीरगंभीर प्रवृत्तीचे, प्रेमळ व एकनिष्ठ बंगाली शेतकऱ्यांत वावरतांना गुरुदेवांचें हळवें मन गहिंवरून गेलें. त्यांचे प्रापंचिक हाल पाहून या भावनाप्रधान कवीचें मन कळवळून गेलें; आणि म्हणूनच त्यानी एकामागून एक रसभरित व भावनात्मक ओव्याव्याचीं असंख्य गीतें, शब्दचित्रें, कथा, कादंबऱ्या लिहून काढल्या आणि बहुजनसमाजाचीं चालतीं बोलतीं चित्रें आपल्या साहित्यांत हुबेहूब चितारलीं. 'एबर फिराओ मोरे' ही त्यांची सुप्रसिद्ध कविता याच वेळीं त्यांच्या लेखणींतून उतरली. "ऐहिक सुखाच्या व सुविधेच्या जीवनापासून मला निवृत्त होऊदे" अशा हांक त्यांनीं या कवितेंतून देवाला दिली—एवढा प्रभाव पडला बहुजनसमाजाच्या दुःखाचा!

## देशभक्तीचा स्फुलिंग

याला अनुषंगून देशभक्तीच्या जाज्वल्य भावना त्यांच्या मनांत पसरत जाणं सहजच होतें. इकडे महा-








राष्ट्रांत लो. टिळकांचे लेख 'केसरी' मधून प्रसिद्ध होत होते. या लेखामधूनच रँड साहेबाचा खून घडला अशा समजुतीवर लोकमान्यांना अटक झाली. या घटनेवर गुरुदेव अक्षरशः तुटून पडले. सरकारच्या धोरणाची त्यांनीं चिरफाड करून सोडली. 'टिळक-निधी' गोळा करण्यांत त्यांनीं हिरीरीने भाग घेतला; इतकेंच नव्हे, कलकत्यांतहि प्लेगच्या प्रादुर्भावाची शक्यता आहे आणि मुंबई-पुण्याची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून हडसून खडसून सूचना देणारें 'कंठ-रोध' हें पत्रक प्रसिद्ध केलें. प्लेगला बळी पडलेल्या लोकांसाठीं सर्वांगीण मदत उभारण्यासाठीं कार्य करणाऱ्या सिस्टर निवेदितांच्या बरोबर त्यानी खूप परिश्रम केले. याच सुमारास 'बंगभंगा'च्या मोहिमेविरुद्ध त्यानी आपला आवाज उठविला. १८९० ते १९०० पर्यंतचीं दहा वर्षे गुरुदेवांनीं विविध प्रकारच्या चळवळीमध्यें घालविलीं; तरी साहित्यरचनेंत त्यांची लेखणी अविरत झिजत होती. १९०० मध्यें त्यांची पुतणी सरलादेवी ( भारतीच्या संपादिका ) हिनें एक विनोदी नाटक लिहून देण्याची गुरुदेवाना विनंती केली. गुरुदेवानी आपलें 'चिरकुमार सभा' ( ब्रह्मचाऱ्यांचा क्लब ) हें विनोदी नाटक केवळ दोन दिवसांत लिहून काढलें. या दोन दिवसांत त्यानी जेवण केलें नाही; झोप घेतली नाही; फक्त दूध-कॉफी-चहा हीं पेयें घेऊन, एका बंदिस्त खोलींत बसून ते सारखे लिहीत होते. इतक्या परिश्रमानंतर नाटकाचें हस्तलिखित नेऊन देण्यासाठीं ते जेव्हा आपल्या पुतणीच्या घरचा जिना चढूं लागले तेव्हा त्याना घेरी आली व ते जिन्यावर पडलेहि.

### बंगदर्शन

नंतर गुरुदेवानी 'बंगदर्शन' या मासिकाचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं. आफ्रिकेमधील बोअर युद्धाच्या संबंधांत त्यानी मासिकामधून ब्रिटिशावर कडक टीका केली. "नैवेद्य' हें त्यांचें सुप्रसिद्ध काव्य याच वेळी जन्मास आलें. गुरुदेवानी हें काव्य जेव्हा आपल्या वडिलांना वाचून दाखविलें तेव्हा वडिलाना अक्षरशः गहिंवर आला. त्यानी आपल्या मुलाला गाढ आलिंगन दिलें आणि काव्याच्या प्रसिद्धिसाठीं लागणारा पैसा तावडतोब देऊन टाकला. १९०१ मध्यें पित्याच्या संमतीनुसार गुरुदेवानी शांतिनिकेतनला ब्रह्मचर्य आश्रमाची स्थापना केली. याच वेळीं तागाच्या पिकांतील नुकसान व आश्रमामुळें झालेलें कर्ज यामुळें गुरुदेव आर्थिक पेचांत सापडले. समुद्रकांठचा पुरीचा बंगला, वाचनालय, विकणें त्याना भाग पडलें. त्यांच्या अर्धांगीनें आपले सर्व दागदागिने-जडजवाहर आपल्या पतीसाठीं विकून टाकलें व पतीला साथ दिली. देवी सरस्वतीने गुरुदेवांची अशा प्रकारें सत्त्वपरीक्षाच घेतली. बंगाली साहित्य, हिंदुस्थानचा इतिहास, हे दोन प्रबंध त्यांनीं याच सुमारास लिहिले. कलकत्ता विद्यापीठाच्या पदवीदान समारंभाच्या प्रसंगीं लॉर्ड कर्झनने पौर्वात्य जनतेवर निष्कारण द्वेषमूलक भाष्य केलें; गुरुदेवांची प्रभावी लेखणी एकदम त्यांच्यावर तुटून पडली आणि तिने कर्झनच्या अपप्रचाराचीं पाळेमुळें खणून काढलीं. मध्येंच गुरुदेवांची लाडकी कन्या 'रेणुका' अतिशय आजारी पडली —त्यावेळी त्यांचें 'शिशु' हें वात्सल्यगीत जन्माला आलें.

### कौटुंबिक आपत्ती

हा काल म्हणजे गुरुदेवावरील कौटुंबिक आपत्तीचाच होता म्हटलें पाहिजे. प्रथम त्यांची अर्धांगी ( १९०२ ) परलोकवासी झाली. 'स्मरण' हें गुरुदेवांचें काव्य तेव्हांच उदयास आलें. पाठोपाठ दुसऱ्या वर्षी ( १९०३ ) त्यांची लाडकी कन्या 'रेणुका' निवर्तली. तथापि स्थितप्रज्ञाप्रमाणें गुरुदेवांचें लिखाण चालूच होतें. 'बंगदर्शन' मासिकाचें कामकाज ते पहात होते. गुरुदेवानी 'रेक' ( Wreck ) ही कादंबरी याच वेळीं लिहिली. 'राजकुटुंब', 'धर्मबोध दृष्टांत', 'धर्मप्रचार' हें सर्व आध्यात्मिक वाङ्मय त्यानीं या वेळीं निर्माण केलें. तसेंच देशभक्ती, स्वदेशी समाज, हिंदुस्थानांतील ग्रामविकास, सहकार्य, स्वावलंबन या विषयावर त्यानी महत्त्वपूर्ण व विचारपरिवर्तक लेख लिहिले. हिंदु-मुस्लिम संबंधांतील मतभेद मिटवून एकी निर्माण करण्यासाठीं त्यानी संघटना निर्माण केली. महाराष्ट्र राज्याचे संस्थापक छत्रपती शिवाजी महाराजांचा उत्सव गुरुदेवानी बंगालमध्यें याच वर्षी साजरा केला. 'शिवाजी-उत्सव' ही त्यांची कविता या निमित्तानें जन्मली. शैक्षणिक शालेय पुस्तकेंहि रवींद्रानी याच वेळी लिहिलीं.

## गुरुदेव टागोरांचें उद्बोधक जीवन

गुरुदेवावर आणखी एक कौटुंबिक आपत्तीचा तडाखा बसला–तो म्हणजे त्यांच्या वडिलांच्या मृत्यूचा (१९०५)! गुरुदेवानी आपल्या कथा, तीन कादंबऱ्या, सहा नाटकें व सर्व कविता, साहित्यविश्लेषणाचे लेख, निबंध हे प्रसिद्ध करण्याचे हक्क केवळ २ हजार रुपयास बंगालच्या हिताब्दी या साप्ताहिकास देऊन टाकले. आगरथळा येथें भरलेल्या त्रिपुरी साहित्य संमेलनाच्या प्रसंगीं गुरुदेवानीं देशांतील राजे–महाराजे याना उद्देशून एक प्रदीर्घ पत्रक वाचून दाखविलें. चैन–षोक यापायीं लक्षावधी रुपयांचा चुराडा करण्याचें सोडून देवून देशांतल्या कलाकुसरीला प्रोत्साहन देण्याचें कार्य राजे-लोकांनीं करावें असें आव्हान त्यानी दिलें. स्वदेशी चळवळीवर त्यानी आपला तुफानी प्रचार सुरू केला. कित्येक राष्ट्रीय गीतें या काळीं त्यांच्या लेखणीतून उतरलीं. विद्यार्थ्यांनी राजकीय चळवळींत भाग घेऊं नये, वंदे मातरम् म्हणूं नये अशीं नवीन बंधनें बंगालमध्यें त्यावेळीं लादलीं गेलीं. तेव्हां गुरुदेवानी दणकेबाज प्रचार करून या बंधनांना विरोध केला. या बंधनामधून ज्या विद्यार्थ्यांची शाळा कॉलेज मधन हाकालपट्टी झाली होती त्यांच्या आश्रयासाठीं गुरु-देवानी 'नॅशनल कौन्सिल ऑफ् एज्युकेशन' या संस्थेची उभारणी केली. 'शिक्षा–समस्या', 'ततः किम्', 'जातीय शिक्षा परिषद' हे लेख त्यानी या संबंधांत लिहिले. इकडे पोलिसांचा अत्याचार वाढत चालला होता; त्यांत जे जे बळी पडले त्यांच्या स्मर-णार्थ गुरुदेवानी दुखवट्याच्या जाहीर सभाहि घेतल्या.

### किंचित् नैराश्याचें अभ्रपटल

स्वातंत्र्य लढ्याच्या चळवळींतील पुढाऱ्यांचे मतभेद, हिंदुमुस्लिम तंटे, त्यांच्यामधील वाढती बेदिली या सर्वांचा ध्येयनिष्ठ रविंद्राना कंटाळा आला. त्यांच्या जीवनांत खरेखुरें नैराश्य निर्माण झालें. कौटुंबिक आपत्तीने त्यांचें मन द्रवलें नसेल त्याच्या शतपटीने तें या आपसांतील मतभेदामुळे विरघळून गेलें. जड अंतःकरणाने ते पुनः शांतिनिकेतनच्या शैक्षणिक कार्यांत येऊन मिसळले. 'बुद्धि-प्रतिकार' या त्यांच्या लेखा-मधून त्यानी सर्व निराशा व्यक्त केली. आत्मशुद्धि व हृदयपरिवर्तन यावर त्यांनी अत्युत्कृष्ठ लेख लिहिले. "पुरे पुरे तें राजकारण!" अशा अवस्थेला येऊन पोहोंचलेल्या रविंद्राच्या जीवनाला वेगळी कलाटणी मिळाली. त्यांची सुप्रसिद्ध 'गोरा' कादंबरी याच संघर्षाच्या पडसादांतून जन्माला आली.

बंगालच्या राजकीय परिषदेनें त्याना अध्यक्षपद मोठ्या आग्रहानें बहाल केलें. तथापि, अध्यक्षपदा-वरून रविंद्रानीं कार्यकर्त्यामधील मतभेद व आपमत-लबीपणा यावर चौफेर हल्ले चढविले. बहुजनसमा-जाच्या अंतरंगांत शिरून विधायक कार्य करण्याचें व हिंदु आणि मुस्लिम यांच्यामध्यें जास्तीत जास्त मतैक्य निर्माण करण्यासाठीं झटण्याचें आवाहन त्यानी आपल्या देशबांधवांना या व्यासपीठावरून केलें. खेड्या-पाड्यांतून शाळा काढाव्यात, रस्ते तयार करावेत, पिण्याच्या पाण्याच्या विहिरी काढाव्यात वगैरे विधायक कार्यासंबंधी त्यांनी मुद्देसूद सूचना मांडल्या. हिंदु–मुस्लिम तंट्यामध्यें कोणत्या पद्धतीने समझोता घडवून आणावा यासंबंधी त्यांनी 'सदुपाय' (प्रामाणिक मार्ग) हा महत्त्वपूर्ण लेख लिहिला. देशांतल्या या दोन शातिबांधवामधील तंट्यानें गुरुदेव किती घायाळ झाले होते हें यावरून दिसून येतें. पुढें देशाच्या इति-हासांत घडून आलेले हिंदु-मुस्लिम तंटे, देशाची फाळणी, नोआखलीचे दंगे–कत्तली हें सर्व पहायला गुरुदेव जिवंत राहिले नाहींत. ते जिवंत असते तर त्यांचा हळवा ध्येयनिष्ठ आत्मा पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणें अक्षरशः तळमळला असता!

---

# दोन रमा

आधुनिक काळांतील महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांतील स्त्रीसृष्टीचा विचार करतांना दोन कर्तृत्व-शाली रमांचें विस्मरण होऊन चालणार नाहीं. एक पंडिता रमाबाई आणि दुसऱ्या रमाबाई रानडे. दोघीहि समकालीन होत्या. दोघांच्या चरित्रांत विलक्षण साम्य तसा थोडाबहुत विरोधहि दाखवितां येईल. दोघींनीं सनातनी समाजाबरोबर टक्कर देत देत स्त्रीवर्गाच्या सेवेंत आणि त्यांच्या आयुष्याला अगदीं नवें वळण देण्यांत आपलें वैधव्यांतील आयुष्य वेंचलें आणि महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासावर आपलीं खोल पावलें उमटवून ठेविलीं.

## दृष्टींतील अंतर तुटत चाललें

पंडिता रमाबाईंचा काळ एप्रिल १८५८ पासून एप्रिल १९२२ पर्यंतचा तर रमाबाई रानड्यांचा काळ जानेवारी १८६२ पासून एप्रिल १९२४ पर्यंतचा. चालू महिन्यांत रमाबाई रानड्यांची जन्मशताब्दि साजरी करण्यांत यावयाची आहे. पंडिता रमाबाईंची जन्मशताब्दि चार वर्षांपूर्वी होऊन गेली. दोन्ही रमा-बाईंचें कार्यक्षेत्र एकच असलें तरी त्या त्या काळच्या समाजाच्या भावनेप्रमाणें दोघींकडे पहाण्याच्या समा-जाच्या दृष्टीमध्यें महदंतर होतें. काळानें दृष्टीमधील हा फरक बराच कमी कमी करीत आणलेला आहे आणि मध्यंतरी झालेल्या अनेकविध सामाजिक क्रांतिमुळें हें अंतर अजिबात नष्ट होण्याइतकी परिस्थिति उत्पन्न होण्याचीं चिन्हें दिसत आहेत.

## पंडिताबाईंचें अद्भुत चरित्र

" पंडिता रमाबाई कांहीं दृष्टींनीं खरोखरच एक लोकोत्तर स्त्री होऊन गेली. हिंदुसमाजाच्या दृष्टीनें त्यांच्या चरित्राचा शेवट हा जसा खेदकारक, तसाच त्यांच्या बालपणचा वृत्तांत अद्भुत या सदराखालीं पड-ण्यास योग्य आहे " असें केळकरांनीं आपल्या ' टिळक चरित्रांत ' म्हटलें आहे. त्यांचे वडील अनंतशास्त्री डोंगरे यांनीं संस्कृत विद्येंत पारंगत होऊन खूप देशा-टन केलें. वयाचे ४४ वे वर्षी एका नऊ वर्षांचे कुमारि-केशीं लग्न करून तिलाहि संस्कृत विद्या शिकविली. स्त्रीशिक्षणाचे दिशन त्यांनीं स्वतःचे घरांत टाकलेलें पहिलें पाऊल त्यावेळच्या समाजाला रुचण्यासारखें किंवा पचण्यासारखें नव्हतें. पण ' अब्रह्मण्यम् ' म्हणून त्यांची निंदा करणाऱ्या शास्त्रीपंडितांना आपलीं पुरोगामी मतें शास्त्राधारेंच पटवून देतांना ते डगमगले नाहींत. समाजाच्या आधारावर विसंबून न राहतां पत्नीसह तेरा वर्षे त्यांनीं हिंस्र पशूंच्या सहवासांत अक्षरशः अरण्यवास आणि एकांतवास पत्करला. आपल्या पायांनीं धांवत आलेल्या आर्तांना आणि जिज्ञासूंना संस्कृत विद्या शिकवून प्राचीन आश्रमीय राहणीचें पुनरुज्जीवन केलें. जांवयाच्या छंदीभंदीपणामुळें कुटुंबावर कोसळलेल्या आर्थिक आपत्तींतून डोकें वर काढून अनंतशास्त्री सहकुटुंब सहपरिवार तीर्थयात्रेला बाहेर पडले. तेव्हां त्यांची कन्या रमा अवघी सहा महिन्यांची होती. कुटुंबाच्या लटांबरासह ही तीर्थयात्रा देशाच्या सर्वभागांतून अनवाणी पायांनीं आणि खाण्या-पिण्याच्या हालअपेष्टांत सतत वीस वर्षे चाललेली होती ! प्रवासांत वाटेनें मुलामुलींचें शिक्षण चाललेलें होतें. सातव्या वर्षीच रमानें वडिलांपासून संस्कृतचे धडे घेऊन लवकरच त्या भाषेंतून विद्वा-नांबरोबर वादविवाद करण्याइतकें प्रावीण्य संपादन केलें. इतक्यांत रस्त्यांतच थोड्या दिवसांच्या अतरानें आई आणि बाप दोघेहि मृत्युमुखीं सांपडून मुलांवर पोरके होण्याचा प्रसंग आला. अनंतशास्त्र्यांना वृद्धापकाळामुळें संपूर्ण अंधत्व प्राप्त झालें होतें. त्यांना इतक्या असहाय स्थितींत मृत्यु आला कीं त्यांची प्रेतयात्रा त्यांच्या दोन मुलींना आणि एका मुलाला मिळून आपल्या खांद्या-वरून पार पाडावी लागली ! पुढें बहिणीचाहि अंत होऊन अनुक्रमें १८ व २० वर्षांचे फक्त बहीणभाऊ शिल्लक उरले. पित्यानें मरतांना रमाला पोटाशीं घट्ट धरून एवढेंच सांगितलें कीं " पोरी, जगली वाचलीस तर








सदाचरणानें आयुष्य घालव आणि जन्मभर ईश्वरसेवा करण्यास चुकूं नकोस ! " पित्याचा हा अंतिम उपदेश रमाबाईंनी नंतरच्या ४६ वर्षांत तंतोतंत आचरणांत आणला. पण तो कसा ? कादंबरीलाहि मागें सारणारी ती सत्यकथा अद्भुत आहे.

## दारिद्र्याचा आणि देशाटनाचा वारसा

वडिलांकडून मिळालेला दारिद्र्याचा आणि देशाटनाचा वारसा दोन मुलांनीं पुढें चालविला. आपलें सत्त्व जतन करीत संस्कृत विद्येच्या बळावर ते पुराणें सांगत आणि प्रवचनें करीत फिरूं लागले. थंडीवाऱ्यांत आणि पावसांत झाडाखालीं निजण्याचेहि प्रसंग आले. १८७८ सालीं फिरत फिरत ते ( त्या वेळच्या ) कलकत्ता राजधानींत येऊन पोंचले. ब्राह्मो समाजानें तेथें समाजसुधारणेकडे सुशिक्षितांचें लक्ष वेधून बरींच वर्षें लोटलेलीं होतीं. पुराणप्रवचनांतून प्रकट होणाऱ्या रमाबाईंच्या पांडित्यानें हां हां म्हणतां सुशिक्षितांचें लक्ष वेधलें आणि त्या पांडित्याची वृत्तपत्रांतून आपोआप होणारी जाहिरात इतर प्रांतहि कान टवकारून ऐकूं लागले. ' पंडिता, ' ' सरस्वती ' इत्यादि पदव्यांचा त्यांचेवर उत्स्फूर्त वर्षाव करण्यांत आला. रमाबाई आपल्या भाषणांतून भारतीय स्त्रियांच्या उद्धारावर विशेष जोर देऊं लागल्या.

## दोन महत्त्वाचीं परिवर्तनें

बंगाल्यांतील मुक्कामांत रमाबाईंच्या आयुष्यांत दोन महत्त्वाचीं परिवर्तनें घडून आलीं. ब्राह्मो समाजांतील सुधारक नेत्यांशीं जसा त्यांचा संपर्क घडून आला तसा ख्रिस्ती धर्मप्रचारकांशीं त्यांचा अधिकाधिक परिचय घडत चालला. दुसरी गोष्ट म्हणजे आसामांतील एका ब्राह्मणेतर हायकोर्ट वकिलाशीं नोंदणीपद्धतीनें त्या विवाहबद्ध झाल्या. या दोन्ही गोष्टींमुळें सनातनी समाज त्यांचेवर कमालीचा रुष्ट झाला. दुर्दैवानें रमाबाईंचें वैवाहिक आयुष्य फार काल टिकलें नाहीं. अवघ्या एकोणीस महिन्यांत त्यांचेवर वैधव्याचा घाला पडला. एकुलता एक भाऊ पूर्वींच निधन पावलेला होता. त्याची जागा आतां नवजात कन्येनें घेतली एवढेंच. वयाचें फक्त चोविसावें वर्ष त्यांनीं गांठलेलें होतें.

## महाराष्ट्रांत आगमन

जन्मानें महाराष्ट्रीय असूनहि आतांपर्यंत त्यांना महाराष्ट्राचा आणि महाराष्ट्राला त्यांचा मुळींच परिचय नव्हता. इकडल्या प्रार्थनासमाजवाल्यांनीं मुद्दाम निमंत्रण पाठवून तो १८८२ मध्यें घडवून आणला. मधलें परदेशांतील सात वर्षांचें वास्तव्य सोडलें तर यापुढें रमाबाईंची महाराष्ट्र हीच अखेरपर्यंत कर्मभूमि ठरली ! रमाबाई कलकत्त्याहून थेट पुण्याला आल्या. दुसऱ्या रमाबाईंची, म्हणजे रमाबाई रानड्यांची, व त्यांची प्रथम भेट झाली ती याचवेळीं ! अवघ्या चार वर्षांनीं लहान असलेल्या या दुसऱ्या रमाबाईंचें आतांपर्यंतचें वीस वर्षांचें आयुष्य अगदीं निराळ्या वातावरणांत, निराळ्या वळणावळणानें, सौख्यांत, पण समाज सुधारणेच्या दिशेनेंच, चाललेलें होतें. पुढें न्यायमूर्ति पदावर आरूढ होऊन केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर अखिल भारतांत ' उपक्रमाचार्य ' या महत्पदास चढलेल्या माधवराव रानडे या बिजवराशीं त्यांचें अकरावें वर्षीं लग्न झालें ! विवाहाचे पहिल्याच दिवशीं त्यांनीं आपल्या समाज सुधारक पतीपासून ' श्रीगणेशाचा 'चा पहिला धडा पाटीवर गिरविला. पंडिता रमाबाईंचें सर्व बालपण वनवासांत गेलें तर दुसऱ्या रमाबाईंच्या वैवाहिक आयुष्याचा पूर्वभाग तत्कालीन सासुरवासांत गेला ! घरांत देखील स्वतःच्या पुरुषांबरोबर वावरण्याची चोरी तर बाहेरच्या समाजांत वावरण्याची गोष्ट कशाला ? स्त्रियांनीं पुस्तकी शिक्षण घेणें हा सामाजिक गुन्हा समजण्यांत येई. पण महादेव गोविंद रानड्यांसारख्या खुद्द पतीनेंच प्रोत्साहन दिल्यावर अडून छपून कां होईना त्यांच्या पत्नी दररोज रात्रीं धड्यावर धडे घेऊं लागल्या.

## दोन रमांची भेट

एका रमेला तिच्या पुरोगामी वडिलांनीं संस्कृत विद्येंत पारंगत केलें, दुसऱ्या रमेच्या पतीनें तिला मराठी लेखनवाचन, हिशोब ठिशोब, यांचें प्राथमिक ज्ञान करून दिलें. योगायोग असा कीं पुण्याला परस्परांची भेट झाल्यावर दोन्ही रमाबाई इंग्रजीचे धडे एकाच गुरूपासून, फिमेल ट्रेनिंग कॉलेजच्या प्रिन्सिपल मिस् हरफर्ड बाई यांचे पासून शिकूं लागल्या. पंडिताबाईंचें पहिलें पुराण पुण्यांत झालें तें रानड्यांचे घरीं ! पुढें दोन्ही रमाबाई वारंवार एकत्र बसूं, बोलूं, हिंडूंफिरूं,

लागल्या. एकीच्या प्रवचनांना दुसरी श्रोता म्हणून नियमानें जाऊं लागली. पण हीच गोष्ट रानड्यांचे घरीं वाढल्या सासुरवासास कारणीभूत झाली ! " ती बाटगी आहे. तिला शिवून आमच्या घरांत शिवूं नकोस. तुम्हाला आवडत असली तर तिला तुम्ही गळ्यांत बांधून बसा, पण आम्हाला हा भ्रष्टाकार खपावयाचा नाहीं ... तिनें बंगाली बाबूशीं लग्न लावून देह बाट-विला.... आतां जग बाटवायला आली आहे ! इ. इ. " माधवराव रानड्यांचे कानावर हे रोजचे प्रहार जात नसत असें नाहीं. पण घरांतील वडीलधाऱ्यांना उलटून बोलावयाचें नाहीं, या शिस्तींत लहानपणापासून ते वाढलेले असल्यामुळें मौन पाळून सोशिकपणानें असल्या गोष्टींकडे ते दुर्लक्ष करीत. रमाबाई रानडे आत्मचरित्रांत लिहितात : "( स्वतःला ) म्हणजे जुन्या भाषेंत ( नवऱ्याला ) ज्या गोष्टी पसंत आहेत, त्या गोष्टी कांहीं झालें तरी केल्या पाहिजेत, नाहीं तर राग येईल, हें मला पक्कें माहित असल्यामुळें स्वतःला (नवऱ्याला) हवी असेल ती गोष्ट करण्याला मी कधीं चुकत नसे. एक जें माझें खऱ्या सुखाचें व समाधानाचें ठिकाण त्यांत अंतर येऊं नये व ही समाधानाची बाजू बळकट असेल तर घरांतील इतर कोणत्याहि माणसांकडून होणारा जाच व त्रास सोसण्याला मला अधिक बळ येईल, अशी माझी पक्की समजूत होती. आठ महिन्यांचा उन्हाळा व एक दिवसाचा पावसाळा, अशी घरांतील इतर आतांची व स्वतःची ( नवऱ्याची ) वागणूक असे. "

रमाबाई रानडे आपल्या मनःस्थितीचें आणखी वर्णन करतात : " मनुष्याला जाच किंवा त्रास फार झाला, म्हणजे त्याचा उद्गार कोणाजवळ तरी काढल्या-शिवाय मन हलकें होत नाहीं, असा अनुभव असतो; तसा उद्गार काढण्यास मला संधि नसल्यानें दिवस-भराच्या त्रासानें संध्याकाळपर्यंत मन अगदीं फुटणाऱ्या गळ्याप्रमाणे होई. पण चमत्कार हा कीं रात्रीं माडीवर गेल्यावर या सर्व गोष्टी मी एका क्षणांत विसरून जाई. जसें कांहीं दिवसभर त्रास झालाच नाहीं ! " "घरां-तील इतर आप्त बायांशिवाय बादरायण नात्याच्या आणखी पांच सात बायका असत. त्या आमच्या वडील बायकांना प्रत्यक्ष अप्रत्यक्ष 'हो' ला 'हो' देऊन मदतच करीत. तरी मी कोणाला कधींच उत्तर देत नसे ... फार झालें म्हणजे खालीं असतांना आपल्याशींच मुळूमुळू रडून, मनाला असह्य झालेला भार हलका करावयाचा, एवढाच मार्ग मला माहीत होता. "

## सार्वजनिक कर्तृत्व

आतां दोन्ही रमाबाईंच्या सार्वजनिक कर्तृत्वाकडे वळलें पाहिजे. पुण्यांतील वास्तव्यांत पंडिता रमा-बाईंनीं 'आर्यमहिला समाजा'ची स्थापना केली. मुख्यतः दर शनिवारी व्याख्यानद्वारा स्त्रियांना शिक्षण देणाऱ्या या संस्थेची निगा राखणारांत रमाबाई रानडे प्रमुख होत्या. पुढें या संस्थेची एक शाखा मुंबईला निघाली. स्त्रियांच्या प्रतिनिधि म्हणून पंडिता रमाबाईंनीं हंटर कमिशनपुढें साक्ष देऊन स्त्रियांच्या शिक्षणाचा जोरानें पुरस्कार केला. पुढें अधिक समाज-निरीक्षण आणि ज्ञानार्जन करण्याचे हेतूनें स्वखर्चानें आपल्या कन्येसह त्या विलायतेला गेल्या. परदेशगमन हें त्यावेळीं महापातकांत मोडत असे हें सांगावयास नकोच. खिस्तभक्तांनीं तेथें दीन दुबळ्यांच्या उद्धारा-साठीं चालविलेल्या प्रयत्नांचा रमाबाईंवर इतका परि-णाम झाला कीं हिंदु समाजाचें त्यांनीं हालअपेष्टा सोसून निरीक्षण केलेलें असल्यामुळें खिस्ती धर्मा-विषयीं त्यांचे मनांत अतीव आदर उत्पन्न झाला आणि विलायतेस गेल्यावर एका वर्षाचे आंत (१८८३) त्यांनीं आपल्या मनोरमा कन्येसह त्या धर्माचा स्वीकार केला ! या कारणानें पं. रमाबाई पुढें हिंदुधर्मीयांपासून दुरावल्या, इतकेंच नव्हे तर स्वकीय समाजाच्या रोषास आणखी कारणीभूत झाल्या ! इंग्लंडांत तीन वर्षें राहून पं. रमाबाई अमेरिकेंत गेल्या व तेथून आणखी तीन वर्षांनीं १८८९ मध्यें जपानमार्गानें आपल्या मायदेशीं परत आल्या. त्याच वर्षी मार्च महिन्यांत त्यांनीं मुंबईस अनाथ अबलांचे शिक्षणासाठीं 'शारदासदना'ची स्थापना केली. पुढील वर्षी ही संस्था मुंबईहून पुण्यास आणि पुण्यास वारंवार प्लेग होऊं लागल्यामुळें १८९५ सालीं पुण्याहून केडगांवास हलविण्यांत आली. त्यांच्या संस्थेंत शिक्षण घेणाऱ्या मुलींचें धर्मांतर घडवून आणण्यांत येतें, या संशयावरून पुण्यांतील वृत्तपत्रांतून फार मोठें वादळ माजलें. कांहीं ना कांहीं कारणानें आपल्या नातलगांकडून आणि समाजाकडून वाळींत टाकल्या गेलेल्या किंवा धिक्कारलेल्या कित्येक












मुलींवर रमाबाईंच्या सदय आणि ममताळू वागणुकीचा परिणाम होणें स्वाभाविक होतें. तथापि लोकनिंदेची पर्वा न करतां पंडिताबाईंनीं स्त्रियांच्या उद्धाराचें काम चिकाटीनें आणि धिटाईनें अखंड चालू ठेवलें.

## विधायक मार्ग

त्यांचेवर टीका करणारांनीं दुसरा विधायक मार्ग दाखविला नाहीं. ती उणीव दूर करण्यासाठीं सुधारक-पंथांतील प्रो. धोंडो केशव कर्वे व न्यायमूर्ति रानडे यांच्या पत्नी रमाबाई यांना पुढें यावें लागलें. न्यायमूर्तींचें निधन जानेवारी १९०१ मध्यें घडून आल्या-नंतर जणूं कांहीं त्यांचें ऋण फेडण्यासाठीं किंवा त्यांनीं दिलेल्या शिक्षणाचें फल समाजाला प्रत्यक्ष दाखविण्या-साठीं वैधव्यावस्थेंत रमाबाईंनीं स्त्रीशिक्षणाचे क्षेत्रांत अधिक पुढाकार घेण्यास सुरुवात केली. त्या वेळीं त्यांच वय ३८ वर्षांचें होतें. त्यांनीं पुण्यांत आपल्या वाड्यांत प्रौढ स्त्रियांचे शिक्षणासाठीं ' सोशल् अँड् लिटररी क्लब'ची स्थापना केली आणि मुंबईंत गांवदेवीवर स्थापन झालेल्या सेवासदनाची शाखा पुण्यांत सुरू केली. प्रो. अण्णासाहेब कर्वे यांनीं हिंगण्याला सुरू केलेल्या ' अनाथ बालिकाश्रमा 'ला पूरक असें हें कार्य होतें. प्रौढ आणि गरजू स्त्रियांना फावल्या वेळांत पुस्तकी आणि धंदे शिक्षणाची सोय अगदीं स्त्रियांच्याच वाता-वरणांत करून मिळाल्यामुळें केवढी मोठी सोय झाली याची साक्ष स्त्रियाच देतील. समाजाची अष्टौप्रहर निंदा सहन करीत बसण्यापेक्षां निराधार आणि विधवा स्त्रियांनीं स्वावलंबनाचा आणि समाजसेवेचा कोणता माग स्वीकारून आपलें आयुष्य सार्थकीं लावावें, याचा रमाबाई रानडे यांनीं स्वोदाहरणानें धडा घालून दिला. पंडिताबाईंपेक्षां त्यांचा प्रयत्न लोकाप-वादाला कमी जागा देणारा होता हें खरें असलें तरी मुळांत स्त्रियांच्या शिक्षणाला आणि स्वावलंबनमूलक स्वातंत्र्यालाच ज्यांचा विरोध होता, त्यांच्या आक्षेपां-तून प्रारंभीं प्रारंभीं रमाबाई देखील सुटूं शकल्या नाहींत ! आतां स्त्रीशिक्षण लोकांच्या इतकें अंगवळणीं पडलेलें आहे कीं दोन पिढ्यापूर्वी समाजाच्या टीकेचा तो एक विषय होता ही गोष्ट खरी देखील वाटत नाहीं. पुस्तकी शिक्षणाबाहेरच्या गरजा भागविण्यासाठीं आतां गांवोगांव महिला मंडळें आणि वनितासमाज यांचा एवढा सुकाळ झालेला आहे कीं दोन्ही रमाबाईंनीं केलेल्या कार्याची किंमत आजच्या पिढीला कदाचित् करतां येणार नाहीं. पण त्यांनीं समाजाच्या निंदेचे घण सोशीत जो मार्ग दाखविला तो शेवटीं फलदायी आणि स्त्रियांना तारक ठरला ही गोष्ट कबूल करावीच लागेल. कृतज्ञतेनें रमाबाईंची जन्मशताब्दि साजरी करावयाची ती याच बुद्धीने.

तसें म्हटलें तर पं. रमाबाईंप्रमाणे रमाबाई रानड्यां-च्या चरित्रांत अद्‌भुतता नाहीं, विविधता नाहीं, धाडसहि नाहीं. न्यायमूर्ति रानडे यांचेसारखा पति लाभला नसता तर त्यांचें आयुष्य कोणत्या मार्गानें गेलें असतें तें सांगणें कठीण आहे. पं. रमाबाईंपासूनहि त्यांना पुष्कळशी स्फूर्ति मिळाली असेल. रानड्यांचे नेतृत्वामुळेंच या अद्वितीय विदुषीच्या निकट सहवा-साचा लाभ त्यांच्या पत्नीला घडला. तथापि रमाबाईंनीं पूर्वीच्या पिढयांतील स्त्रीचीं सर्व व्रतें पाळून नवीन काळाला उचित अशी आपली वैधव्यावस्था घालविली आणि नवीन पिढीतील स्त्रियांना स्फूर्तिदायक मार्गदर्शन केलें हें काय थोडें झालें ?

—— श्री








## वाचकांचा-पत्रव्यवहार —

### 'चंद्रहास्याख्याना'चा कर्ता

'नवभारत'च्या नोव्हेंबर १९६१ च्या अंकांत "एक चंद्रहास्याख्यान" हा माझा लेख प्रसिद्ध झालेला आहे. त्यांत ह्या आख्यानाच्या कर्त्यासंबंधीं मला निश्चित असें विधान करतां आलें नव्हतें. ह्या आख्यानाचा कवि विष्णुदासनामा कीं नामापाठक असा प्रश्न होता व मनाचा कल विष्णुदास नाम्याकडेच अधिक झुकत होता. "हें आख्यान नामापाठकाचें नसेलच असें म्हणवत नाहीं. तरीहि वर जे बाह्य व अंतर्गत आधार दिले आहेत त्यावरून त्याचा कर्ता विष्णुदासनामाच ठरेल असें वाटतें" असें मी म्हटलें होतें.

परवां (ऑक्टोबरच्या अखेरच्या आठवड्यांत) पुण्यांतील भारत इतिहास संशोधक मंडळांतील हस्तलिखितांची पाहणी करीत असतांना तेथें 'चंद्रहासकथा'[2] नांवाचें प्रकरण पाहावयास मिळालें. माझ्याकडील आख्यानाशीं तें तपशीलवार तळून पाहणें शक्य नव्हतें. परंतु दोहोंतील सारखेपणा ध्यानांत आला. त्या प्रकरणाचा कर्ता नामा पाठक हा आहे. अनुक्रमें पहिल्या व तिसऱ्या प्रसंगाच्या अखेरीस पुढील ओव्या आढळल्याः —

(१) आतां दुष्टबुधी उठवी जेवना : तैं येकादसी जाणां :
तैं ऐकावें श्रोतेजणां : तेथे काये वर्तलि वीवंचणा :
तें पाठक नामा सांगे :

(२) ऐसे सोडीले शामकर्ण वारू : पुढें टाकीले कोण स्थाणेः
तें पाठकनामा करी कथण : तें श्रुतेहो परीयेसा :

धुळयाच्या 'समर्थ वाग्देवतामंदिरां'तहि "पाठकनामाकृत 'चंद्रहास्य अख्यान'" असल्याची माहिती मिळते. त्यांत तीन प्रसंग असून एकूण ओवीसंख्या ४७५ आहे.[3] ही प्रत कांहीं मी पाहिलेली नाहीं. परंतु सध्यां मात्र मला उपलब्ध झालेल्या 'चंद्रहास्याख्याना'चा कर्ता नामा पाठक आहे एवढी दुरुस्ती माझ्या लेखांत करतों.

— पण्डित आवळीकर

### द्रविड भारतांत केव्हां आले ?

'नवभारता'च्या डिसेंबरच्या अंकांतील "द्राविड भारतांत केव्हां आले" हा लेख वाचला. प्राचीन भारताच्या काल्पनिक वंशसंघर्षाबद्दल पाश्चात्य संशोधकांनी ज्या भाकडकथा रचून ठेवल्या आहेत त्यांचा मासला म्हणून या लेखांतील तर्कपद्धतीकडे वाचकांचें लक्ष वेधूं इच्छितों.

(१) दक्षिण भारतांतील उत्खननांत कांहीं अवशेष सांपडले अशा एका तथ्याचा या लेखांत उल्लेख आहे. एवढ्या एका तथ्यावरून हे अवशेष इ. स. पूर्व ५०० चे आहेत, ते ज्या संस्कृतीचे आहेत ती संस्कृति "द्राविड"भाषी होती, हे "द्राविड"भाषी लोक भारताच्या बाहेरून आले वगैरे सिद्धांत ठोकून दिले आहेत. या सिद्धान्तांचा व उत्खननांत सांपडलेल्या अवशेषांचा काय संबंध आहे याचा प्रस्तुत लेखावरून कांहींच बोध होत नाही. मूळ प्रबंधांत तो होत असल्यास श्री. सुंठणकर तो सादर करतील काय ?

(२) सिंध संस्कृतीच्या संशोधनानंतर "वेदकालीन संस्कृतीचें अति प्राचीनत्व सिद्ध करण्याचा अट्टाहास फोल झाला आहे" असें लेखक म्हणतात. हें वाक्य अगण्य आहे. सिन्ध संस्कृतीचे अवशेष सापडल्यामुळें वेदांचें प्राचीनत्व कसें काय असिद्ध होतें ?

(३) दीक्षितांनी कृत्तिकांच्या उदयावरून ठरवलेला वेदकाळ निर्णायक आहे. त्याची दखल न घेणारें वेदकालविषयक संशोधन व्यर्थ आहे.

(४) "ही संस्कृति दक्षिण भारतांत आली कोठून !" असा "आर्य" आले कोठून ? या प्रश्नासारखा प्रश्न लेखांत आलेला आहे. याला तर्कशास्त्रांत प्रश्नांचा हेत्वाभास म्हणतात. * संस्कृति कोठून तरी बाहेरूनच आली पाहिजे असा आग्रह काय म्हणून ?

— नी. र. वऱ्हाडपांडे

१ नवभारत, नोव्हेंबर. १९६१, पृ. ५७.
२ हस्तलिखित क्रमांक २९-२३६८.
३ श्रीरामदासीसंशोधन, प्रथम खंड, पृ. ३०३.
* आर्य, द्रविड वगैरे लोक पामीरचें पठार, उत्तर ध्रुव वगैरे ठिकाणावरून आले नसून संशोधकांच्या डोक्यांतून आलेले आहेत हें मी जुलै १९६१ च्या नवभारतांत दाखवून दिलें आहे.




# मीटरचा वापर करा

लांबी मोजण्याचे एक परिमाण म्हणून मीटरचा वापर १ ऑक्टोबरपासून सुरु करण्यात आला आहे. एक वर्षानंतर वार (गज), फूट व इंच ही परिमाणे कायदेशीर राहणार नाहीत.

कापडाची लांबी आता मीटरमध्येच छापलेली असते; कापडाचा भावहि मीटरमध्येच दाखविलेला असतो.




अनुक्रमणिका

## पुस्तक-परीक्षण –

### मराठ्यांच्या दोन प्रख्यात इतिहासकारांचा तौलनिक चरित्रात्मक परिचय

[ जदुनाथ सरकार आणि रियासतकार सरदेसाई– तौलनिक चरित्रात्मक अभ्यास, लेखक श्री. रा. टिकेकर; पॉप्युलर प्रकाशन, पृष्ठें १५६; मूल्य रु. ५. ]

सरकार व सरदेसाई हे आधुनिक भारतांत मोठे व ख्यातनाम इतिहासकार होऊन गेले. इतिहास हें त्यांचें उपास्य दैवत होतें. त्यांची उपासना त्यांनीं अव्याहत व एकनिष्ठपणें अर्धशतकावर केली. त्या उपासनेत केवळ अभ्यास व अध्यापन नव्हतें, मूल्यवान् निर्मिति पण होती. हजारों पृष्ठें भरतील इतकी अफाट ग्रंथसंपत्ति या दोघांनीहि निर्माण केली. सरदेसाई यांचें लक्ष मराठी इतिहासावर केंद्रीभूत झालें यांत विशेष नवल नाहीं. योगायोग असा कीं अवरंगजेबाच्या व त्याच्या साम्राज्याचा खोल अभ्यास करतांना त्याकाळीं महाराष्ट्रांत झालेल्या अपूर्व राजकीय आंदोलनाची व क्रांतीची ओळख सरकारांना झाली. त्यांचें चित्त त्या रोमांचकारी विषयांत रमलें. मराठी इतिहासाबद्दल त्यांना कुतूहलच नव्हे तर आस्था व आत्मीयता उत्पन्न झाली. तो नीट समजून घेण्यासाठीं ते मुद्दाम मराठी भाषा शिकले. अस्सल कागदपत्रांचें व इतर साधनसामग्रीचें परिशीलन करून शिवाजीच्या चरित्रावर त्यांनीं विद्वत्तापूर्ण ग्रंथ लिहिला व शिवाजीच्या अलौकिक कर्तृत्वाचा व असामान्य व्यक्तिमत्वाचा अधिकारी वाणीनें जगास परिचय करून दिला. या ग्रंथाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. त्यांच्यावर टीका पण पुष्कळ झाली. जाणत्या विद्वानांनीं त्यांतील त्रुटि व गैरसमज दाखवून दिले. तथापि शिवचरित्राच्या व मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासकाला हा ग्रंथ प्रमाणभूत मानूनच पुढें चिकित्सेचें पाऊल टाकावें लागतें. सरदेसायांनीं प्रथम मुसलमानी रियासत लिहिली. मराठीमध्यें इतक्या विस्तृत पृष्ठसंख्येची त्या विषयावर ग्रंथरचना झालेली नाहीं. तथापि त्यांची खरी कामगिरी मराठ्यांच्या इतिहासाच्या क्षेत्रांत दिसून आली. मराठेशाहीचा इतका समग्र व तपशीलवार इतिहास दुसऱ्या कोणी लिहिला नाहीं.

जदुनाथांचें वास्तव्य व कर्मभूमि मुख्यतः उत्तर हिंदुस्थानांत, पाटणा; काशी, कटक व कलकत्ता या शहरांमध्यें आयुष्याच्या पूर्वार्धांत त्या ठिकाणीं त्यांना नोकरीनिमित्त रहावें लागलें. सरदेसायांच्या आयुष्याचीं तीन तपें बडोदें संस्थानच्या नोकरींत गेलीं. त्यावेळीं सुद्धां त्यांचा पुण्यामुंबईशीं दृढ संबंध होता. निवृत्तीनंतर लोणावळ्याजवळ कामशेत येथें ते स्थाईक झाले व जवळ जवळ आणखीं तीन तपें त्यांनीं तेथें काढलीं. एकमेकांपासून हजार मैल दूर असणाऱ्या व परस्परांना अज्ञात असणाऱ्या एक बंगाली व एक मराठी अशा दोन भिन्नभाषी अभ्यासकांचा केवळ कार्यसाधर्म्यामुळें गाढ स्नेहसंबंध जडला आणि आश्चर्य असें कीं सतत पन्नास वर्षे तो टिकला ! अखेर मृत्यूमुळेंच तुटला ! दोघांच्याहि स्वभावांत व मनाच्या बांधणींत कांहीं ओबडधोबड कंगोरे नव्हत, त्यांत बोंचक विषमता नव्हती, असें नाहीं. त्यांचें घर्षण देखील मधून मधून होई. तथापि या घर्षणामुळें कधीं ज्वालाग्राही ठिणग्या उडाल्या नाहींत किंवा स्नेहसंबंधाला त्यांची झळ लागली नाहीं. विद्वानांच्या इतक्या प्रदीर्घ व अखंड टिकलेल्या मैत्रीचीं उदाहरणें क्वचितच आढळतात.

### चिर आणि गाढ मैत्रीचे इतिहासकार

सामान्य जनांच्या मैत्रीला, मग ती कितीहि गाढ असो, सार्वजनिक महत्व असण्याचें कारण नसतें. तिच्या आविष्काराचें क्षेत्र बव्हंशीं भावनात्मक व संकुचित असतें, कांहीं थोड्या व्यक्तींच्या खाजगी जीवनावर केंद्रित झालेल असतें. विद्वज्जनांच्या मैत्रीला मात्र केवळ वयक्तिक व खाजगी स्वरूप राहूं शकत नाहीं; कारण त्या मैत्रीमध्यें भावनेच्या इतकेंच किंबहुना थोडें अधिकच आकर्षण समव्यवसायाचें, वैचारिक देवघेवीचें व बुद्धिविलासांचें असतें. त्यांनीं परस्परांशीं चर्चा व विनिमय केलेल्या विषयांत्रे महत्व सर्व समाजाला असतें. त्यांच्या खाजगी पत्रव्यवहारांतसुद्धां विद्यादेवीच्या प्रसन्नतेचें अनेकदां दर्शन घडतें, कार्योत्पत्तीच्या प्रक्रियेचें व तिच्या अंगोपांगांच्या घडणीचें चित्र नजरेला पडतें. त्यामुळें समानधर्मी पंडितांच्या सौहार्दाकडे लोक जिज्ञासेनें पहातात व त्यांतून जितका ज्ञानलाभ घेतां येईल तितका मिळविण्याचा प्रयत्न करतात यांत नवल नाहीं. सरकार व सरदेसाई यांची मैत्री या वर्गांत मोडत असल्यामुळें तिची साद्यंत माहिती मिळूं शकली तर इतिहासाभ्यासकांना समाधान वाटतें.








## गुणावगुणांचें दिग्दर्शन

प्रख्यात पत्रपंडित श्री. श्री. रा. टिकेकर यांना या दोघांहि इतिहासकारांना अगदीं जवळून पहाण्याचें भाग्य लाभलें होतें. दोघांशींहि त्यांचा पत्रव्यवहार होत असे. विशेष म्हणजे ज्या इतिहासक्षेत्रामध्यें सरदेसाई व सरकार यांचा संचार एकाग्रतेनें व तन्मयतेनें होत होता त्या विषयाबद्दल श्री. टिकेकरांना आपुलकी वाटत असल्यामुळें व त्या क्षेत्रांत ते स्वतः चांगले व्यासंगी असल्यामुळें या दोन विद्वानांच्या कार्याचें साक्षेपी मूल्यमापन करण्याचा प्रयत्न करणें त्यांना शक्य होतें. दोघांच्याहि स्वभावांतील विचित्रपणाचा व मानवी अपूर्णतेचा त्यांनीं स्वतः अनुभव घेतला व पाहिला होता. दोघांचींहि लेखनात्मक, संकलनात्मक व इतर कामें करण्याची संधि त्यांना अनेकदां मिळाली होती. या सर्व अधिकृत व स्वयंज्ञात सामग्रीच्या जोडीला लेखकाचें लेखनकौशल्य व रसदार मांडणी यांची भर पडल्यामुळें नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या श्री. टिकेकरांच्या या दीडशेंवर पानें असलेल्या पुस्तिकेमुळें मराठींतील इतिहास वाङ्मयांतच नव्हे तर व्यक्तिचित्रण वाङ्मयांत पण उपयुक्त भर पडली आहे. सरदेसाई किंवा सरकार यांचा विस्तृत जीवनपट या पुस्तिकेंत आढळणार नाहीं, त्यांच्या संसारी जीवनावर फक्त धावता दृष्टिक्षेप टाकलेला आढळेल. मराठ्यांच्या इतिहासाबाबत या दोन इतिहासकारांची कामगिरी किती श्रेष्ठ दर्जाची होती हें चिकित्सक दृष्टीनें दाखविण्याचा लेखकाचा उद्देश आहे. त्या अनुषंगानें दोघांच्याहि व्यक्तिमत्वांतील गुणावगुणांचें दिग्दर्शन करण्याचें लेखकांनीं टाळलें नाहीं, प्रांजलपणें तें केलें आहे. तत्कालीन परिस्थितिजन्य पण आज तीस वर्षांनंतर विस्मय व खेद उत्पन्न करणाऱ्या विद्वानांच्या आपसांतील वितुष्टांचें, श्रेष्ठगंडांचें व वैयक्तिक द्वेषांचें वर्णन व त्यांवरील श्री. टिकेकरांची प्रतिक्रिया वाचकास उद्बोधक वाटतील.

## दप्तरतपासणीचें अवाढव्य काम

पेशवे दप्तरांतील कागद तपासून, त्यांतून योग्य त्यांची निवड करून, ते प्रसिद्ध करण्याचें प्रचंड कार्य जदुनाथांच्या सहकार्यानें व आपुलकीच्या साहाय्यानें सरदेसायांनीं पार पाडलें. टिकेकर त्या कार्यास 'ऐतिहासिक' हें विशेषण लावतात. ३५००० रुमालांतील मोडी लिपींत लिहिलेले असंख्य कागद पहावयाचे, त्यांचें परीक्षण करावयाचें, त्यांतील महत्वाचे वाटतील ते प्रकाशनासाठीं तयार करावयाचे, हें अवाढव्य काम आहे. सामान्य शक्तीच्या माणसांकडून असें काम सहसा पार पडण्याजोगें नसतें. विषयाच्या पार्श्वभूमीचें व सर्व तऱ्हेच्या अनुसंधानांचें सम्यक् व संपूर्ण ज्ञान असल्याशिवाय अशा कामाला हात घालतांच यावयाचा नाहीं. त्यांशिवाय सूक्ष्म व सारासारविचारी दृष्टि, नितांत चिकाटी व मेहेनत हे गुण अंगीं असावे लागतात. अखंड व्यासंग व अखंड श्रम हें सरदेसायांच्या जीवनाचें सार होतें. सरकारांमध्यें पण ते गुण प्रकर्षानें वास करीत होते. त्यामुळें हें अवघड काम हातीं घेण्यास ते आत्मविश्वासानें पुढें सरसावले व पांच सहा वर्षांतच त्यांनीं तें संपूर्ण केलें. त्यानंतर लगेच रेसिडेन्सी रेकार्डस्चें संशोधन हातीं घेऊन इतर सहकाऱ्यांच्या सहाय्यानें ७०००वर पृष्ठें भरतील इतका त्यांतील मजकूर सरकारांनीं प्रसिद्ध केला.

## प्रतिकूल राजकीय वातावरण

अगदीं आगंतुक व अतिशय कटकटीच्या कांहीं अडचणी सरदेसायांच्या मार्गांत सुरवातीलाच आल्या. एक म्हणजे त्यावेळचें राजकीय वातावरण. जित देशांच्या इतिहासाबाबत जेत्यांची दृष्टि उदासीन व संशयी असते. त्या इतिहासांतील बऱ्यावाईट प्रसंगांचें व स्फूर्तिदायक गतगोष्टींचें जित समाजाला विस्मरण व्हावें, त्यांबाबत त्यांचा बुद्धिभेद व्हावा, हें जेत्यांच्या हिताचें असतें. या वृत्तीला अनुसरून सरकारच्या संग्रहीं असलेलें मराठ्यांच्या इतिहासांतील विविध व्यवहारांचा तपशील देणारें मूल्यवान् रुमालभांडार अभ्यासी जनांच्या दृष्टीस सहजासहजीं पडूं नये अशी त्या वेळची राजनीति होती. तिच्या कडकपणांत थोडी तरी ढिलाई यावी यासाठीं पुष्कळ प्रयत्न पुष्कळ दिवस चालू होते. सरकारदरबारीं वजन असलेल्या नामांकित विद्याविभूषितांनीं तें केले व जुन्या दप्तरांचें भांडार अभ्यासकांना उपलब्ध व्हावें ही लोकांची मागणी सरकारनें तत्वतः मान्य केली. तथापि ही मान्यता संपूर्ण व खुल्या दिलाची नव्हती. त्यामुळें प्रत्यक्ष कामास सुरुवात झाल्याबरोबर प्रथम प्रथम महत्त्वाचे कागद

मिळण्यालाच केवळ तांत्रिक विघ्नें उपस्थित करण्यांत येऊं लागलीं. त्यांच्या पाठीमागें असलेला निर्बुद्धपणा कितीहि उघड असला तरी त्यांचें निवारण होणें सोपें पडेना. या अनपेक्षित अनुभवानें सरदेसाई संत्रस्त होऊन गेले. पुढें तर काटकसरीचें निमित्त करून या कामासाठीं होणाऱ्या खर्चाला काट लावण्याचाच सरकारनें बेत केला ! तव्हां जदुनाथ व सरदेसाई यांनीं आपल्या स्नेही राजेरजवाड्यांकडून रु. १२००० देणगी म्हणून मिळविले व सरदेसायांनीं स्वतः कांहीं मोबदला न घेतां काम पुरें केलें. नंतर पूना रेसिडेन्सी कॉरसपॉन्डन्स या पत्रव्यवहाराचे १४–१५ खंड जदुनाथ यांनीं सरदेसाई व इतर स्नेही यांच्या सहकार्यानें विनावेतन संपादित केले, त्यासाठीं करावा लागणारा प्रवास देखील स्वखर्चानें केला. हें ऋण मुंबई सरकारनें नमूद केलें असल्याचा उतारा टिकेकरांनीं आपल्या पुस्तकांत दिला आहे.

## मनस्ताप देणाऱ्या गोष्टी

याहिपेक्षां खरा मनस्ताप देणारी व एकंदरींत विपरीत स्वरूपाची अडचण म्हणजे संपादनाच्या कामासाठीं झालेल्या सरदेसायांच्या नेमणुकीला कांहीं जाणत्या मंडळींकडून झालेला तीव्र विरोध व त्याला अनुसरून मुंबईच्या कायदेमंडळामध्यें प्रश्नोत्तरद्वारां त्यांच्यावर झालेली अपमानास्पद चिखलफेक ! मनाला खटकणाऱ्या या प्रसंगाचा टिकेकरांनीं विस्तारानें निर्देश केला आहे. हा प्रसंग त्यावेळीं समक्ष पाहिलेल्या माणसांना, आज त्यांचें वर्णन वाचीत असतांना वा त्यांतील वैयक्तिक हेव्यादेव्यांची व शिवराळपणाची उजळणी होत असतांना, डोळ्यापुढें पुनः उभा राहिल्यासारखा वाटतो. विद्वत्ता व मनाचा क्षुद्रपणा यांचें कधीं कधीं इतकें निकट सख्य असूं शकतें याचा विस्मय वाटतो. संशोधनक्षेत्रांत त्याकाळीं महाराष्ट्रांत सरदेसायांपेक्षां अधिक मातबर माणसें नव्हतीं असें म्हणतां येण्याजोगें नाहीं कारण भारत इतिहास संशोधक मंडळ ही संशोधनास वाहून घेतलेली, मराठ्यांच्या इतिहाससंबंधींचे हजारों कागदपत्र अनेक ठिकाणांहून मिळवून आणण्यांत यश पावलेली व स्वतःच्या कर्तबगारीवर विद्वज्जनांत प्रतिष्ठा संपादन केलेली अशी संस्था होती. महाराष्ट्रांतील बहुतेक प्रख्यात इतिहासाभ्यासकांचा तिच्याशीं घनिष्ठ संबंध होता. पेशवे दप्तरासारख्या बहुमोल संग्रहाच्या प्रकाशनाबाबत कांहीं निर्णय घेतांना व त्याचा अम्मल करतांना सरकारनें आपला सल्ला घ्यावा अशी मंडळाची अपेक्षा असला तर त्यांत गैर काय होतें ? मंडळाच्या कारभारांत दोष व न्यूनता नसतील असें नाहीं. कधींकधीं त्यांतील अहंमन्यता व अव्यवस्थितपणा मर्यादेपलीकडे पण गेलेला असेल. पण या सर्व चुकींचें स्वरूप इतकें गंभीर होतें कां कीं सरकारनें मंडळाच्या कर्तृत्वाची, प्रेरणेची व त्याला प्राप्त झालेल्या दर्जाची उपेक्षा करावी ?

## मंडळाविषयीं सरकारची दूषित दृष्टि

वस्तुस्थिति अशी होती कीं प्रथमपासूनच एकंदरींत मंडळाकडे पहाण्याची सरकारची दृष्टि असावी तशी निर्मळ नव्हती, साशंकी होती. त्यांच्या कांहीं कार्यकर्त्यांबद्दल त्यांचे प्रतिकूल पूर्वग्रह असावेत. सरकार-दरबारी मानमान्यता मिळालेल्या विद्वानांबद्दल त्यांना अधिक आत्मीयता व विश्वास वाटे. दुर्दैवानें या दुसऱ्या वर्गांत मोडणाऱ्या कांहीं प्रख्यात विद्वानांचा मंडळाशीं तीव्र मतभेदच नव्हे तर विरोध होता व त्याला जदुनाथांजवळ जवळ शत्रुत्वाचें स्वरूप आलें होतें. जदुनाथांसारख्या मराठी इतिहासाच्या गाढ्या व कळकळीच्या अभ्यासकाचा अंतर्भाव या वर्गांत होत होता हा दुःखद दैवदुर्विलास होय. सरदेसाई पण त्यांच वर्गांतले, जराशा कमी तीव्रतेनें व कमी प्रमाणांत इतकेंच. सकारण किंवा अकारण मंडळाबद्दल विलक्षण कटुता बाळगणाऱ्या नेमक्या या दोघां गृहस्थांना पेशवे दप्तराचें काम देण्यांत आलें तर त्याचें शल्य मंडळाला वाटल्याशिवाय कसें राहील ? मंडळानें तें स्पष्टपणें बोलून दाखविणें हें पण साहजिकच होतें. गुणवत्तेच्या मोजपट्टीनें नव्हे तर इतर अप्रस्तुत कारणांमुळें आपण केलेल्या व करीत असलेल्या कार्याची अवहेलना होत आहे असा कार्यकर्त्यांचा व इतर लोकांचा समज झाला तर त्यांचा रोष होऊन त्याला वाचा फुटणें यांत नवल नाहीं.

तथापि टीकेच्या व निषेधाच्या धारेला पण मर्यादा असावी लागते. सुसंस्कृत जीवनाचा तो गाभा आहे. प्रहार करतांना सुद्धां संयम राखला तर त्या प्रहाराला एक प्रकारचा अभिजातपणा येतो व तो अधिक प्रभावी व यशस्वी ठरतो. अप्रिय घटना एकदां होऊन गेली,



अनुक्रमणिका








तिच्याबाबत विरोधी आवाज उठवून तिचें कठोर दोषा-विष्करण केलेंच म्हणजे नंतर पुनः पुनः तिचें चर्वितचर्वण करीत बसण्यामध्यें सामान्यतः काळाचा व परिश्रमाचा अपव्यय होतो, सभोंवतालचें बौद्धिक वातावरण वाजवी-पेक्षां अधिक काळ गढूळ व दूषित रहातें व सत्कार्य-निर्मितींत व्यत्यय येतो. चांगल्या जाणत्या मंडळींना देखील या संयमी मानसिक शिस्तीच्या सुपरिणामांचें अनेकदां विस्मरण होतें ही एक सामाजिक व्यथा समजली पाहिजे. पुण्यासारख्या बुद्धिप्रधान व संस्कारी नागरिक जीवनामध्यें या वैगुण्याचा मागमूससुद्धां असूं नये अशी अपेक्षा बाळगणें अगदीं रास्त आहे. तथापि पेशवे दप्तराच्या कामावर झालेल्या सरदेसायांच्या नेमणुकीच्या प्रकरणांत ती अपेक्षा दुर्दैवानें पूर्णपणें फोल ठरली. सरदेसायांवर अश्लाघ्य टीकेची राळ उडाली आणि तिचा उगम मंडळांत नव्हता असें म्हणतां येणार नाहीं. अंतर्मुख होऊन स्वतःच्या गुणाबरोबर स्वतःच्या दोषांचा पण शोध घेण्याची निर्लेप तत्परता इतिहासकाराच्या अंगीं अत्यवश्य असावी लागते. नेमकी हीच शक्ति इतिहास-मंडळाच्या आवाक्याबाहेरची ठरली !

## पुण्याच्या वैशिष्ट्याचा बोभाटा

वर उल्लेखिलेलें वैगुण्य केवळ पुण्याचें खास वैशिष्ट्य होतें अशी समजूत करून घेणें मात्र वास्तवतेस धरून होणार नाहीं. त्यांचा असा व्यातिसंकोच करणें बरोबर कसें ठरेल ? कमीजास्त प्रमाणांत तें सर्वत्र आढळत नाहीं कां ? खुद्द जदूबाबूंचेंच उदाहरण पहा. ते तर पुण्याचे नव्हते ना ? त्याच्या अंगभूत असहिष्णुतेचा, अहंकाराचा, सुविद्य माणसास न साजेशा दीर्घद्वेषाचा व गालिप्रदाननैपुण्याचा उत्तम साक्षात्कार होण्याइतकें टीकात्मक कथन टिकेकरांच्या पुस्तकांतच आहे ! आत्मश्लाघी अट्टाहासानें शिवाजीला जाणून बुजून शिव म्हणून संबोधत रहाण्यांत कोणती शास्त्रशुद्धता अथवा तत्वनिष्ठा साधावयाची होती ? या हेकटपणाची सहानुभूतिजन्य संगति लावण्याचा टिकेकर कितीहि प्रयत्न करोत. सामान्य वाचकाला तिच्यांत मानसिक विकृती-चाच प्रत्यय येणें अधिक स्वाभाविक आहे. टिकेकरां-नींच सांगितलें आहे कीं श्यामाप्रसाद मुकर्जीसारख्या सुसंस्कृत व उच्च श्रेणीच्या पुढाऱ्याला देखील असें स्पष्टपणें म्हणावें लागलें कीं श्यामाप्रसाद आपल्या वडिलांचे म्हणजे आशुतोष मुकर्जींचे चिरंजीव होते याच त्यांच्या अपराधामुळें ते जदुनाथांच्या रोषास व तुच्छतेस पात्र ठरले होते !

## दोघांतील साम्य व विरोध

मानवी मोठेपणाचें मूल्यांकन करतांना वैगुण्यापेक्षां गुणवत्तेवरच लक्ष केंद्रित करावें लागतें. गुणवत्तेचें आधिक्य असलें, तिच्या वजनामुळें तिचें पारडें खालीं गेलेलें असलें, म्हणजे हलकेपणामुळें वर गेलेल्या दुसऱ्या पारड्याकडे विशेष कटाक्षानें पहाण्यांत तात्पर्य नाहीं. टिकेकरांच्या पुस्तिकेंत सरकार व सरदेसाई यांच्या मूल्यवान् कार्याची व त्याच्या सृजनासाठीं अवश्य असणाऱ्या अंतर्गत शक्तींची चांगली ओळख होते. तसें पाहिलें तर या दोघा विद्वानांच्या मनाचा पिंड एकसारखा नव्हता. बुद्धीनें तल्लख, व्यासंगामध्यें सातत्य व सखोलपणाबरोबर पुष्कळ रुचिवैचित्र्य व व्यापकता असलेले विशालदृष्टि पंडित असे जदुनाथ होते. सर-देसायांचा मुख्य गुण म्हणजे कधींहि विराम न पावणारी उद्योगशीलता व अव्याहत व्यासंग. त्यांची बुद्धि व शिक्षण सामान्यप्रतीचें होतें. पण असामान्य चिकाटी व ध्येयनिष्ठा यांच्या बळानें सामान्य मनुष्यसुद्धां केवढें मोठें काम करूं शकतो याचें सरदेसाई हें मूर्तिमंत उदा-हरण होय. भावनांना जबरदस्त धक्का देणाऱ्या अशा संसारी जीवनांतील आपत्ति दोघानांहि सहन कराव्या लागल्या. मुली, मुलगे, जावई यांचे मृत्यू सरकारांना पहावे लागले, नातवंडांना वाढविण्याचा भार वृद्धापकालीं शिरावर घ्यावा लागला. तारुण्याच्या ऐन उमेदींत आलेल्या एकुलत्या एका सुविद्य मुलाचा अंत परदेशांत झालेला ऐकण्याचें दुःख व दुर्भाग्य सरदेसायांच्या वाट्याला आलें. तथापि अशा ऐहिक आपत्तींनी ते दोघेहि खचले नाहींत. स्थितप्रज्ञाच्या अविचल वृत्तीनें त्यांनीं आपलें अंगिकारलेलें कार्य पार पाडलें. आयुष्यांतील पंचावन्नाव्या वर्षानंतरचा काळ उतारवयाचा व विश्रांतीचा असें सामान्यतः मानण्यांत येतें. या विश्रांतीच्या काळांतच सतत तीस वर्षें सरकार व सरदेसाई पूर्णपणें कार्यान्वित होते आणि त्याच्या परिपक्व बहराचा आस्वाद लोकांना घेतां आला !









### हृदयस्पर्शी आत्मकथन

सरदेसायांना त्यांच्या ८२ व्या वाढदिवसाच्या वेळीं लिहिलेल्या पत्रांत जदुनाथ लिहितात: " इतकीं वर्षे जगतां येणें ही मोठीच ईशकृपा होय. हीं सारीं वर्षे इतरांच्या उपयोगासाठीं देतां येणें हें तर मोठेंच सुख ! आपण उभयतांनीं आपल्या जीवनाचीं पंचाहत्तर वर्षे उगीच कशीतरी कठलीं आहेत असें नव्हे. पण सुख सुख म्हणून म्हणतात तें आरामशीर रहाणींत किंवा भोगांत असल्यास तें आपणांस लाभलें नाहीं. मानसिक यातना व कौटुंबिक काळजी यापासून आपण मुक्त नव्हतो. आपणां उभयतांना श्रेष्ठ लौकिक लाभला, आपलें साहित्यहि महत्त्वाचें ठरलें. ...... इतउत्तरचें जीवन संकटाच्छादित दिसतें. तुम्ही तर एकटेच आहात -एक उंच पहाडावरील एकटा तपस्वी ! मी मात्र कौटुंबिक काळजींत मग्न आहे ...... लोकांकडून शाबासकी मिळावी किंवा व्यवहारी लाभ व्हावा या अपेक्षेनें आपण मुळींच वागलों नाहीं. ज्ञानवृद्धि व्हावी, सत्य स्पष्ट व्हावें, म्हणूनच आपण जन्मभर समाधानानें, अभिमानानें वागलों -त्याच रीतीनें आपलें उरलेलें आयुष्य व्यतीत व्हावें ! " किती हृदयस्पर्शी आत्मकथन आहे हें !

### संकलनकार कीं इतिहासकार ?

सरदेसाई हे केवळ संकलनकार होते, इतिहासकार ही संज्ञा खऱ्या अर्थानें त्यांना देणें अतिशयोक्तीचें आहे, असें त्यांचे टीकाकार प्रतिपादन करतात. आपण प्रथम पंक्तीचे इतिहासकार आहोंत असा संभ्रम अथवा दुराग्रह सरदेसाई यांनीं कधींच बाळगला नाहीं. ते आपल्याला मुद्दाम रियासतकार म्हणवून घेत. तथापि संकलनकार्यांत हीनतेचें अथवा कमीपणाचें सूचन असल्याचें काय कारण आहे ? संशोधनांचा परिपाक त्याच्या पुढच्या पायरींत म्हणजे संकलनांत झाला नाहीं तर ज्ञानक्षेत्रांमध्यें ती मोठी उणीव ठरते. नुसत्या साधनसामग्रीच्या उपलब्धीनें क्षुधाशमन होत नाहीं. त्यासाठीं शिजून तयार झालेल्या अन्नांत तिचें रूपांतर व्हावें लागतें. संशोधन केलेल्या माहितींतील निरनिराळ्या रंगीबेरंगी धाग्यादोऱ्यांचें नीट परिशीलन करून, सुसंगत रीतीनें त्यांना एकत्र आणून व एकसूत्र करून, त्यांतून निघणारें संपूर्ण चित्र डोळ्यांपुढें उभें करणें ही कला व हें शास्त्र संशोधनाइतकेंच महत्त्वाचें आहे. सरदेसायांनीं ती कामगिरी हातीं घेतली व विलक्षण चिकाटीनें ती पार पाडली. त्यांच्या संकलनक्षमतेमध्यें उच्च दर्जाची प्रतिभा प्रचीत होत नसेल, व्यक्ति, परिस्थिति व प्रसंग यांचें सूक्ष्म व साक्षेपी परीक्षण नसेल, हृद्य रसिकतेचा विलास नसेल, डौलदार भाषेचें सौंदर्य नसेल. पण इतस्ततः विखुरलेली नानातऱ्हेची माहिती प्रयासानें अभ्यासणें आणि तिच्यांत समाविष्ट असलेला शेंकडों पानें व्यापणारा राजकीय चित्रपट सलगपणें तयार करून तो लोकांपुढें मांडणें हें काम लहान सहान नव्हे. मोठें आहे. महाराष्ट्रांत दुसऱ्या कोणीहि तें अंगिकारलें नाहीं किंवा केलें नाहीं. सरदेसायांनीं तें यशस्वी रीतीनें पूर्ण केलें याबद्दल महाराष्ट्र त्यांचा कृतज्ञ राहील.

### जदुनाथांचा दीर्घ व्यासंग

जदुनाथांनीं पण मराठ्यांच्या इतिहासाच्या परिशीलनाला स्वतःच्या कार्यक्षेत्रांत जितक महत्त्वाचें स्थान दिलें होतें तितकें दुसऱ्या कशालाहि दिलें नव्हतें. त्यांचा दीर्घ व्यासंग व बुद्धिसर्वस्व त्या अभ्यासावर केंद्रित झालें होतें. त्यांच्या ओजस्वी लेखणींतून शिवाजीचें चरित्र उतरलें व त्या महान् राष्ट्रपुरुषासंबंधींचे अनेक अपसमज त्यांनीं पुराव्यांनिशीं खोडून काढले. सरदेसायांना सतत पन्नास वर्षें त्यांनीं बंधुभावानें व आत्मीयतेनें प्रोत्साहन दिलें. निरुत्साहाच्या प्रसंगीं धीर दिला. बारीकसारीक तपशिलांबाबतसुद्धां लक्ष घालून मार्गदर्शन केलें व मदत केली. टिकेकरांनीं यासंबंधीं दिलेली माहिती नवीन व रसप्रद आहे. जदुनाथांनीं याप्रकारें महाराष्ट्राची मूल्यवान सेवा केली. तिचें ऋण निःसंकोचपणें मानलें पाहिजे.

### मराठ्यांच्या इतिहासाचा अभ्यास

चाळीस पन्नास वर्षांपूर्वी मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासाला महाराष्ट्रांत बहर आला होता. त्या विषयाच्या प्रेमानें भारावून गेलेल्या अनेक विद्वान संशोधकांनीं, स्वतःच्या पोटापाण्याचे इतर उद्योग संभाळून, या कामाला वाहून घेतलें होतें. भारत इतिहास संशोधक मंडळासारख्या संस्थेची स्थापना या उत्साहाचें दृश्य स्वरूप होतें असें समजण्यास हरकत नाहीं. अनेक स्थळांतून हजारों अस्सल कागदपत्रें व इतर साधनसामग्री मंडळाच्या





अनुक्रमणिका

कार्यकर्त्यांनीं परिश्रमपूर्वक जमविली, शेंकडों प्रसिद्ध केली, त्यासंबंधीं निबंध लिहिले व वाचले. सृष्टिक्रमाप्रमाणें त्या कार्यकर्त्यांची पिढी आतां बहुतेक इतिहासजमा झाल्यासारखी आहे. त्यांनीं सुरू केलेल्या बहुमोल कार्यांत खंड न पडेल, त्याचा वेग मंदावत जाऊन शेवटीं शून्य मर्यादपर्यंत न पोहोंचेल अशी दक्षता विद्यासेवकांनीं व समाजधुरीणांनीं घ्यावयास नको कां ? निदान अलीकडे महाराष्ट्रांत तरी विद्यापीठांतून व त्यांच्याशीं सलग्न असलेल्या महाविद्यालयांतून इतिहासाच्या अध्ययन अध्यापनांत बरेंच शैथिल्य व उदासीनता आलेली दिसते. राष्ट्रसंवर्धनाच्या दृष्टीनें अशी अनास्था इष्ट नव्हे. राष्ट्राच्या जीवनांत त्यांचा भूतकाळ समाविष्ट झालेला असतो. त्यांचें योग्य ज्ञान न झालें तर भविष्याच्या घडणीला योग्य तो आकार व बळकटी येणें कठीण पडतें.

## जीवनाचीं मूल्यें बदलत चाललीं

गेल्या तीस चाळीस वर्षांत एकंदर परिस्थिति फार पालटली आहे याचा विसर पडून चालावयाचें नाहीं. जीवनांचीं मूल्यें बदललीं आहेत, जीवनकलह अतिशय तीव्र झालेला आहे. समाजामधील एकंदर ज्ञानलालसाच लोपली आहे, विद्यार्जनाची उत्कंठाच अस्तंगत झाल्यासारखी आहे असें समजणें मात्र बरोबर नाहीं. ती तृप्त करण्याचे तीस चाळीस वर्षांपूर्वीचे मार्ग आजच्या परिस्थितीला अनुरूप नाहींत हें सत्य आहे. मागील पिढींतील विद्वान मंडळी केवळ कार्याच्या धुंदीमुळें काम करीत होती, त्यांना वेतनाची किंवा मानधनांची विशेष फिकीर नव्हती यांत शंका नाहीं. पण आजच्या अशांत व विलक्षण धडपडीच्या आयुष्यक्रमणांत पूर्वींच्या अपेक्षा बाळगत रहाणें रास्त आहे कां ? सर्व क्षेत्रांमध्यें—क्रीडा क्षेत्रांत सुद्धां, किंवा संसद अथवा विधान सभा यांचा लोकनियुक्त सभासद म्हणून कर्तव्य करीत असतांनासुद्धां—जर योग्य त्या वेतनाची अपेक्षा ठेवणें व ती पुरी करणें योग्य ठरलें तर इतिहाससंशोधन क्षेत्रच त्याला अपवादरूप कसें राहील ? अंतर्यामीची ऊर्मि असली म्हणजे असें काम होतें. पैशाच्या आमिषानें अथवा प्रलोभनानें तें होऊं शकत नाहीं, पुण्याची व महाराष्ट्रांची तशी परंपरांच आहे, इत्यादि युक्तिवादांत तथ्य नाहीं असें नाहीं. पण एका मर्यादेपलीकडे त्याला चिकटून बसणें वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं, इतकेंच नव्हे तर तें हानिकारक आहे. काळाचा व परिस्थितीचा संदर्भ मूल निश्चितीपासून तोडूं पहाणें आववेकांचें होईल.

## नवीन अपेक्षा

भारत इतिहास संशोधक मंडळ, राजवाडे संशोधन मंदिर अशा जबाबदार व आदरणीय संस्थांनीं मराठ्यांच्या इतिहासाबाबत जमवलेली साधनसामग्री प्रचंड व मूल्यवान् आहे. तिच्यांत भर घालणारा प्रवाह सतत जिवंत राहील, आटणार नाहीं, अशी व्यवस्था झाली पाहिजे. त्याचप्रमाणें या भांडाराचा सतत उपयोग होत राहील व त्यांच्या दीर्घ अध्ययनानें इतिहासकथनाची विद्वत्तापूर्ण ग्रंथनिष्पत्ति होत राहील याची चिंता वाहिली पाहिजे. या विषयाची आवड असणाऱ्या, तत्संबंधीं उच्च क्षमता प्राप्त केलेल्या व संपूर्णपणें याच कामीं वाहून घेतलेल्या पगारी संशोधक, अध्यापक, प्राध्यापक इत्यादींची नेमणूक झाल्याविना कांहीं प्रगति होणार नाहीं. विद्यापीठ व महाविद्यालयें यांचा या कामीं सहकार घेणें फलदायी ठरेल. कार्यकर्त्यांना योग्य तें वेतन देण्यांत तत्परतेचा अभाव असूं नये. विद्याविकास व गुणवत्तेचा प्रकर्ष हीं ध्येयें कल्याणकारी लोकराज्यांत अभिप्रेत आहेत. त्यांची प्रत्यक्ष सिद्धी अनुभवतां येणें यासारखा दुसरा आनंद नाहीं.

एक माहितिपूर्ण, मनोरंजक व एका अर्थानें नेहमींच्यापेक्षां जरा वेगळ्या धाटणीचें पुस्तक लिहिल्याबद्दल श्री. टिकेकरांचें अभिनंदन केलें पाहिजे.

— म. रा. पाळंदे

---












**समाजक्रांतीची प्रयोगभूमि–इस्राएल** ( लेखक –वसंत नारगोलकर, प्रकाशक–कुसुम नारगोलकर, मंत्री आदिवासी ग्रामसेवा संघ, कैनाड, द्वारा डहाणू रोड, जि. ठाणे ( महाराष्ट्र ), किं. रु. १-५० न. पै. )

सुप्रसिद्ध सर्वोदय कार्यकर्ते श्री. वसंत नारगोलकर यांचे ' साधना ' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेले चार लेख आणखी थोड्या पत्रव्यवहाराची भर घालून ७० पृष्ठांच्या या छोट्या पुस्तकांत ग्रथित करण्यांत आलेले आहेत. ' भूदान अभ्यास मंडळा'च्या वतीनें इस्राएल या पश्चिम आशियांतील नवीन राष्ट्राला भेट देण्यासाठीं गेलेल्या तीस सभासदांपैकीं श्री. नारगोलकर हे एक होते. त्या देशांतील सहकारी शेतीचा, सामूहिक जीवनपद्धतीचा आणि नवसमाज रचनेच्या कार्यक्रमाचा प्रत्यक्ष परिचयानें अभ्यास करणें, हा या भेटीचा मुख्य उद्देश होता. अलीकडे भारतांतील लोकांना आपल्या देशांत नेऊन व अल्प मुदतींत त्यांना ठराविक गोष्टी दाखवून भारून टाकण्याचें एक नवीन प्रचार तंत्र उपयोगांत आणलें जात असल्याचें वारंवार ऐकूं येतें. परदेशांत जाऊन अर्ध्या हळकुंडानें पिवळे झालेल्या या भाटांचीं सुरस व्याख्यानेंहि ऐकावयास मिळतात. पण भूदान अभ्यासमंडळाविषयीं तसें म्हणतां येणार नाहीं. त्यानीं पांच महिने इस्राएलमध्यें मुक्काम ठोकला. त्यांतील कांहीं सभासद तेथील हिब्रू भाषा शिकले आणि बहुतेकांनीं तेथील कुटुंबांत किंवा सामूहिक संस्थांत एक किंवा दोन आठवडे राहून निरनिराळ्या थरांतील किंवा गटांतील जीवन प्रत्यक्ष अनुभविलें. व्यक्तिशः किंवा गटशः चर्चा करून आपल्या शंकाकुशंकांचें निरसन करून घेतलें.

धार्मिक आणि राजकीय छळामुळें आपली मातृभूमि सोडून शतकानुशतकें जगभर देशोधडीस लागलेल्या ज्यू लोकांनीं पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांचा फायदा घेऊन अरबांचें आणि ब्रिटिशांचें वर्चस्व झुगारून दिलें आणि दि. १४ मे १९४८ रोजीं ' इस्राएल ' या सार्वभौम आणि स्वतंत्र राज्याची प्रस्थापना केली. पिढ्यान् पिढ्या परदेशांत घालविलेले ज्यू लोक मातृभूमीच्या अभिमानानें हजारोंच्या संख्येनें स्वदेशांत परतूं लागले. आपल्या देशाच्या संरक्षणासाठीं परदेशांतून त्यांनीं जसें अगणित युद्ध साहित्य आणलें, त्याप्रमाणें अभिजात वैश्यवृत्तीवर परदेशांत मिळविलेला अगणित पैसा त्यांनीं ओढून आणला. देशाच्या सर्वांगीण समृद्धीसाठीं लागणारी बुद्धिमत्ता, उद्योगशीलता आणि चिकाटी, हे भांडवल त्यांचेजवळ होतेंच. निरनिराळ्या देशांत राहून मिळविलेला अनुभवहि त्यांच्या चांगला उपयोगी पडला. इस्राएलच्या भूमीला निसर्ग फारसा अनुकूल नाहीं. येशू ख्रिस्ताच्या या जन्मभूमींत ओसाड, दलदलीचा, वाळवंटाचा, आणि डोंगराळ प्रदेशच अधिक. शेती आणि उद्योगधंदे यांची वाढ यथायथाच. जनतेंत शिक्षणाचा प्रसार अल्पल्प. आपल्या इकडच्या कच्छपेक्षांहि छोटा म्हणजे अवघा आठ हजार चौरस मैलांचा देश आणि लोकसंख्या सरासरी एका जिल्ह्याएवढी म्हणजे पंधरा सोळा लाख. त्यांत मुख्य भरणा ज्यू लोकांचा असला तरी मुसलमानांची संख्या सवा लाखावर तर ख्रिश्चनांची सुमारें अर्धा लाख. देश अरब राष्ट्रांनीं वेढलेला, इतकेंच नव्हे तर त्या राष्ट्रांना पोटांतील शल्याप्रमाणें भासणारा असल्यामुळें शत्रुत्वाची नंगी तरवार अहर्निश डोक्यावर टांगती असलेला. इतक्या सर्व बाजूनीं प्रतिकूल परिस्थितींत ज्यू लोकांनीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या अवघ्या एका तपाच्या अवधींत शेतींत आणि उद्योगधंद्यांत केवढी तरी प्रगति करून घेतली आहे. लोकशाहीच्या मार्गानें इस्राएलचीं पावलें पडत चाललीं आहेत. तथापि समाजक्रांतीचा अमुकच एक मार्ग तेथें अट्टाहासानें अनुसरला जात आहे, असें म्हणतां येणार नाहीं, तर तेथें समाजक्रांतीची जणु प्रयोगशालाच उघडण्यांत आलेली आहे आणि तिच्यांतून








भारतानें पुष्कळच शिकण्यासारखें आहे असें नारगोळकरांनी पुस्तकाच्या नांवानेंच सूचित केलें आहे.

भोंवताली अहर्निश दबा धरून बसलेल्या शत्रूच्या जाणिवेमुळें सहकारी तत्वाचा अवलंब करणें ज्यू लोकांना अनिवार्य होऊन बसलें, आणि त्यांच्या लोकशाहीनिष्ठ सरकारनें केवळ पुरुषांनाच नव्हे तर स्त्रियांनाहि सक्तीचें सैनिकी शिक्षण केलें. श्री. नारगोळकर–लिहितात, " ज्यूइश धर्माच्या बंधनानें एकत्र आणले गेलेले, राष्ट्रनिर्मितीच्या ध्येयासाठीं बद्धपरिकर झालेले व समाजवादी विचारानें भारलेले तरुण स्त्रीपुरुष, अरबांच्या विरोधामुळें त्यांच्यापासून सशस्त्र संरक्षण करण्याची आवश्यकता, प्रतिकूल हवामान, पडित जमीन, साधनांचा अभाव, शेतीविषयींचें अज्ञान आणि म्हणून व्यक्तिगत शेती यशस्वी होण्याची अशक्यता, बाहेरचें विपुल आर्थिक साहाय्य, या गोष्टी इस्राएलमधील समूह–जीवन संघांच्या स्थापनेला व वाढीला कारणीभूत झाल्या. " या सामूहिक जीवनाचे निरनिराळे प्रकार लेखकानें वर्णन केले आहेत, " राष्ट्रीय जीवनाचीं बहुतेक सर्व अंगें व्यापणारे ' हिस्ताद्रुत'चें कामगार संघटन, सुमारें २३० ' किबुट्झ् ', ३४७ ' मोशाव ', यांच्या प्रत्येकीं वेगवेगळया व स्वतंत्र संघटना, सहकारी खरेदी-विक्री संस्था, खरेदी-पुरवठा संस्था, सहकारी रुग्णनिधि, घरबांधणी, पाणीपुरवठा, बींबियाणें पुरवठा, वाहतूक, पशुविमायोजना, गोवंशसुधारणा इ. सहकार चळवळीचीं त्रिविध अंगें होत. कामगारांच्या संघटनेनें कामगारांच्या हितसंरक्षणाबरोबर स्वतःच्या मालकीचे कारखानेहि काढलेले आहेत. ' मोशाव ' म्हणजे व्यक्तिगत शेती, व्यक्तिगत कौटुंबिक जीवन आणि गांवाच्या सेवासहकारी संस्थेचें सभासदत्व स्वीकारणाऱ्या शेतकऱ्याची सहकारी वसाहत. शेती व्यक्तिगत असली तरी जमीन ' ज्यूइश राष्ट्रीय निधीच्या मालकीची असते आणि तीसुद्धां सबंध वसाहतीच्या ताब्यांत असते, वसाहतीचा सभासद होणाऱ्या शेतकऱ्याला समान प्रमाणांत ती व्यक्तिगत पद्धतीनें कसायला मिळते इतकेंच. किबुट्झ् म्हणजे स्वेच्छेनें संघटित झालेले सामूहिक जीवन संघ, समाजवादाचा हा एक प्रयोग आहे. स्त्री-पुरुष-समानता, जीवनोपयोगी कामाचें समान आर्थिक आणि सामाजिक मूल्यमापन, मुलांचीं वयोमानाप्रमाणें संगोपनगृहें व वसतिगृहें, सामूहिक भोजनगृहें, अंतर्गत व्यवहारांत ' नाणेमुक्ति ' शोषणमुक्ति आणि शासनमुक्ति, हें किबुट्झ् जीवनाचें वैशिष्ट्य होय. कोणत्याहि प्रकारच्या जबरदस्तीवाचून ग्रामीण जीवनांत हें सहकार्य घडवून आणण्यांत येतें. त्यांतहि आणखी मौज ही कीं सर्व किबुट्झ् मधील जीवन एकाच पद्धतीचें आणि एकाच विचारसरणीनी भारलेलें आढळणार नाहीं. एका टोंकाला संपूर्णपणें धार्मिक जीवन घालवूं पाहणाऱ्या सनातनी वृत्तींच्या लोकांचीं किबुट्झ् पहावयास सांपडतात, तर दुसऱ्या टोंकाला जहाल, वामपक्षीय, नास्तिक, जागतिक साम्यवादाशीं मिळतें जुळतें घेऊं पहाणाऱ्या मार्क्सवाद्यांचेहि समूह-जीवनसंघ अस्तित्वांत आहेत. परंतु इस्राएलचें संरक्षण देशभक्ति, आणि सामूहिक जीवनपद्धति हीं सर्वांना समान आहेत, असा लेखकानें आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. तथापि कुटुंबपद्धतीपेक्षां समूहजीवनपद्धतींत व्यक्तीच्या व्यक्तिमत्वाचा कोंडमारा होतो ! अशी शंका येऊन इस्राएल मध्यें अलीकडे सहकारी कृषिवसाहतींचा आणखी एक पर्यायी नमुना मोशाव शितूफी नांवानें रूढ करण्यांत आलेला आहे. या प्रयोगांत शेती सामूहिक, अवजारें वगैरे साधनें सामूहिक मालकीचीं परंतु राहणी मात्र कुटुंबपद्धतीची असते. जेवणखाण व मुलांचें संगोपन ' मोशाव ' प्रमाणें प्रत्येक कुटुंब आपापल्या घरींच करतें. मोठ्या प्रमाणावरील सामूहिक आर्थिक व्यवहाराचे फायदे आणि व्यक्तिगत कौटुंबिक जीवनाचे फायदे एकत्र करून

आदर्श समाजव्यवस्था प्रस्थापित करण्याचा हा प्रयत्न अद्यापि व्हावा तसा लोकप्रिय झालेला नाहीं, हें मात्र लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कारण प्रकार–संकरामुळें मोशाव व किंबुट्झ् या दोन प्रकारच्या वसाहतींतील गुण एकत्र येण्याऐवजीं त्या दोहोंतील दोष मात्र एकत्र आले आहेत, असा कित्येकांचा अनुभव आहे !

भारतांतील गांधीप्रणीत आश्रमीय जीवनाची इस्राएलमधील किबुट्झ्मधील जीवनाशीं तुलना करतांना लेखक म्हणतो, " आश्रमीय जीवनांत पराकोटीचा ध्येयवाद आहे म्हणूनच कदाचित् आश्रमीय जीवन सर्वसामान्यांसाठीं नाहीं अशी समजूत होते. किबुट्झ् जीवनाचें तसें नाहीं. त्यांतील ध्येयवादांत ज्याप्रमाणें हिंसाहिंसेचा प्रश्न नाहीं, किंवा समृद्धीच्या मर्यादेचा विचार नाहीं, त्याप्रमाणें राजकीय सत्तास्वीकाराचेंहि त्याला वावडें नाहीं. आश्रमीय जीवनांत सत्य, अहिंसा, आदि निष्ठांप्रमाणें ब्रह्मचर्य, आस्वाद, सर्वधर्मसमभाव आदि व्रतांना वा विचारांना जें प्राधान्य असतें, तें किबुट्झ् जीवनांत नसतें. यमनियमाच्या वा संयमाच्या स्वरूपाच्या व्यक्तिगत साधनेचा विचार त्यांत मानला जात नाहीं. ही तुलना करून लेखक लागलीच स्वानुभवावरून कीं काय म्हणतो कीं, " याचा अर्थ आश्रमांत राहणारीं सर्वच माणसें किबुट्झ्मध्यें राहणाऱ्या माणसांपेक्षां व्यक्तिशः श्रेष्ठ असतात असा कोणी करूं नये. कदाचित् कांहीं व्यक्तींच्या बाबतींत नेमकी उलटहि वस्तुस्थिति असण्याचा संभव आहे ! "

भारतानंतर अवघ्या एक वर्षाचे आंत इस्राएल हा छोटा देश सार्वभौम स्वतंत्र लोकसत्ताक राज्य झालें. दोन्ही देशांचा लोकशाहींतील प्राथमिक अनुभव सारखाच आहे ! सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळीं भारतांत १५ पासून २५ पर्यंत राजकीय पक्ष सत्तास्पर्धेनें आखाड्यांत उतरतात त्याप्रमाणें सामाजिक व आर्थिक बाबतींत सहकाराचे प्रयोग करणाऱ्या इस्राएलमध्यें सत्तास्पर्धेनें राजकीय पक्षाची संख्या तितक्याच मर्यादेपर्यंत पोहोंचते !! पण भारतांतील काँग्रेसप्रमाणे तेथें बलिष्ठ पक्ष असल्यामुळें फ्रान्स प्रमाणें मंत्रिमंडळाच्या वारंवार उलथापालथींचा कटु अनुभव इस्राएलला भोगावा लागत नाहीं. शत्रूच्या वेढ्यामध्यें तेथील राजकीय परिस्थितीला स्थिरता प्राप्त झालेली आहे.

आपल्या इस्राएलमधील वास्तव्याचा आणि तुलनात्मक अभ्यासाचा निष्कर्ष सर्वोदयवादी नारगोलकरांनीं असा काढला आहे कीं, " इस्राएलमधील शेतीवसाहतींचें आणि कृषिविकासाचें जें कार्य आम्ही पाहिलें आणि अभ्यासिलें, त्यानें ग्रामीण विभागांत विज्ञानाच्या साहाय्यानें आणि योजनाबद्ध प्रयत्नांच्या द्वारां विकास कसा घडवून आणावा, याचें आम्हाला पुष्कळच ज्ञान झालें. एक व्यावहारिक दृष्टि मिळाली. तिचा लाभ भूदानयज्ञ–आंदोलनाला व विशेषतः ग्रामपुनर्निर्माणाच्या कामाला आणि अल्पांशानें कां होईना, पण सबंध देशाला मिळवून देणें शक्य आहे. ग्रामीण जीवनाचा एक सार्वत्रिक नमुना म्हणून आपल्या येथें किबुट्झ् स्थापण्यासारखी परिस्थिति नाहीं आणि तशी आवश्यकताहि नाहीं परंतु ग्रामदानी गांवांतून गांवच्या आर्थिक आणि सामाजिक जीवनाची ' मोशाव ' अथवा ' मोशावशिनूफी ' च्या धर्तीची सहकारी तत्वावर पुनर्रचना करतां येईल. परंतु हें घडवून आणण्यासाठीं पुष्कळ सेवकांची आवश्यकता आहे. आपल्या येथें पक्षनिष्ठ राजकारणानें विधायक कर्तृत्वाची जागा घेतली आहे. त्याचा दुष्परिणाम नवशिक्षितांवर प्रत्यहीं होत आहे. पन्नास वर्षांपूर्वी इस्राएलमध्यें ज्याप्रमाणें आदर्श सामूहिक वसाहती स्थापण्याचे प्रयोग समाजवादी तरुणांनीं केले, तसे प्रयत्न समाजवादाचा उद्घोष करणाऱ्या आपल्याकडील काँग्रेस, समाजवादी, किंवा कम्युनिस्ट पक्षाच्या व या पक्षांबाहेरच्या कार्यकर्त्यांनीं कां करूं नयेत ? केवळ निवडणूकप्रधान राजकारणांतच कां अडकून राहावें ? "

—श्री








## नव्या जगांत सहा महिने

( लेखक- डॉ. प्र. न. जोशी, प्रकाशक स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन, ४१० शनिवार पेठ, पुणें २. पृष्ठें २३१, किं. रु. ४-५० )

डॉ. प्र. न. जोशी यांनीं आतांपर्यंत मराठी साहित्यांत बरीच मोलाची भर टाकलेली आहे. हें नवीन पुस्तक लेखकाच्या कीर्तीला साजेसेंच आहे. अमेरिकन सरकारची फुलब्राइट शिष्यवृत्ति घेऊन डॉ. जोशी १९५६-५७ मध्यें शैक्षणिक पाहणी करण्यासाठीं अमेरिकेंत गेले. तें उद्दिष्ट साधीत असतांना अमेरिकेंतील समाज-जीवनाचा अभ्यास करण्याची त्यांना आयती संधि मिळाली, तिचा त्यांनीं सहा महिन्यांच्या अवधींत भरपूर फायदा घेतला. त्यांनीं केलेल्या बारीक निरीक्षणाचा परिपाक म्हणजेच हें पुस्तक होय. ज्ञात जगाच्या दृष्टीनें एके काळीं ' नवें ' वाटणारें, पण आतां पुष्कळच ' जुनें ' झालेलें अमेरिका खंड भारताच्या दृष्टीनें कित्येक बाबतींत अजूनहि नवें आहे, म्हणूनच कीं काय लेखकानें ' नवें ' हें विशेषण कायम ठेवलेलें आहे.

वैज्ञानिक शोधामुळें काळ आणि स्थळ यांमधील अंतर बरेंच कमी झालें आहे, अद्यापि होत आहे. त्यांत परदास्यानें उभ्या केलेल्या कृत्रिम भिंती भराभर कोसळून पडत आहेत. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अमेरिका आणि भारत यांचें राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक, दळणवळण पुष्कळच वाढलें. तथापि डॉ. जोशी यांनाच प्रत्यक्ष अनुभव आल्याप्रमाणें अमेरिकेंतील लोकांना भारताबद्दल फारच थोडी माहिती आहे ( आणि जी आहे ती विपरीत आहे ! ) त्याप्रमाणे भारतांतील सर्वसामान्य माणसाला अमेरिकेची फारच थोडी माहिती आहे.

चांगल्या सुशिक्षित लोकांच्या देखील ज्ञानांत पुष्कळ भर पडेल, किंबहुना अमेरिकेंतील कित्येक प्रसिद्ध संस्थाच नव्हे, तर मोठमोठीं प्रेक्षणीय स्थळें पाहिल्याचें त्यांना घरबसल्या श्रेय मिळेल, अशा रीतीनें लेखकानें शैलीदार भाषेंत आणि उद्बोधक रीतीनें आपल्या अमेरिकेंतील वास्तव्याचें चित्र रेखाटलें आहे. भौतिक सुधारणेच्या अग्रभागीं असलेल्या अमेरिकेंतील माणसाचें दैनंदिन जीवन अथपासून इतिपयत कसें यंत्रमय झालेंलें आहे त्याची सविस्तर माहिती पुस्तकांत वाचावयास मिळते : " अगदीं साधें बिनश्रमाचें कां काम असेना पण तेथेंहि यंत्र सेवेस हजर असतें. कोठें बटन दाबा, कोठें चावी फिरवा, कीं नाना यंत्रें तुमच्यासाठीं भराभर कामें करूं लागतील. अमेरिकन जीवनांतील दुसरा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे गतिमानता, गर्दी, धांदल, गडबड, जीवनाच्या सर्व अंगांतून प्रगट झालेली दिसते. रस्त्यावर अखंडपणें मोटारींची धांवपळ चालू असते. जितकीं माणसें तितक्या मोटारी म्हणानांत ! यंत्र मदतीस असलें तरी प्रत्येक मनुष्य खूप काम करतो. श्रीमंत राबतात, गरीब-गरीब फारसे या देशांत नाहींत-सुद्धां राबतात. श्रम करण्यांत कोणासहि कमीपणा वाटत नाहीं. चांगलीं श्रीमंतांचीं मुलेंहि वृत्तपत्रें विकतात. दुसऱ्याच्या घरीं ' बेबी सिटर ' होऊन मुलें सांभाळण्याचें काम करतात ...... अमेरिकन जीवनाचा तिसरा महत्त्वाचा विशेष म्हणजे भौतिक सुखाची तीव्र लालसा... शास्त्राच्या व श्रमाच्या बळावर ऐहिक सुखाची पेठ या नव्या जगांत उतरलेली आहे असा देखावा मानवाने येथें उभा केला आहे. "

असें वर्णन करतांना लेखकानें दुसरी बाजूहि दिली आहे. यांत्रिक धांदलींत सांपडलेले अमेरिकन लोक धार्मिक जीवनाला पारखे झालेले नाहींत. अमेरिकेचा ' जन्म ' च मुळीं धर्मच्छलांतून झालेला आहे ! एकादे दिवशीं ( रविवारी ) अगदीं नियमानें स्त्रीपुरुषांच्या झुंडीच्या झुंडी व्यवस्थित पोशाक करून मंदिरांकडे जात असलेलें दृश्य भारतांत देखील दिसायचें नाहीं ! हा केवळ बाह्य देखावा नाहीं. डॉ. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणें " सामूहिक जीवनांत धर्माचें महत्त्व अमेरिकेनें ओळखलेलें दिसतें... एकमेकांचें सहकार्य, बंधुभाव, सलोखा, उदारता या गुणांनीं येथील सामाजिक जीवन खरोखरीच समृद्ध आहे. " " सर्व समाजानें मिळून आपला शैक्षणिक प्रश्न सोडविलेला असतो. हें सामूहिक जीवन आपणांकडे किती प्रमाणांत आढळतें ?

लेखकानें अमेरिकेंतील नीतिमत्तेचीहि शेवटीं ओझरती चर्चा केली आहे. पण " नीतीच्या कल्पना सर्व देशांत सर्व काळीं सारख्या आहेत असें नाहीं. " असें म्हणून तो चिकित्सेच्या फार खोलांत शिरला नाहीं, हें बरें झालें.

— श्री



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष









# फक्त दशमान वजनेंच कायदेशीर

ज्या भागांत दशमान वजनांचा वापर सक्तीचा करण्यांत आला आहे, त्या भागांतील व्यापाऱ्यांनीं त्यांच्याजवळील शेर–पौंड आदि वजनें तावडतोब काढून टाकून फक्त दशमान वजनांचा उपयोग सुरू करावा. शेर, पौंड आदि अनधिकृत वजनें ज्यांचेजवळ सांपडतील ते मुंबई वजनें व मापें (अंमलबजावणी) कायदा, १९५८ अन्वयें शिक्षेस पात्र ठरतील.



महाराष्ट्र राज्यांत पुढील विभागांत दशमान वजनांचा वापर सक्तीचा करण्यांत आला आहे. मुंबई नगरपालिकेचें क्षेत्र, पुणें, नागपूर, औरंगाबाद, सोलापूर, कोल्हापूर, अकोला, अमरावती, वर्धा आणि यवतमाळ; तसेंच पुढील ठिकाणीं शेतमाल बाजारांत दशमान वजनांचा वापर याच वेळीं सक्तीचा करण्यांत आला आहे. नाशिक, धुळें, लासलगांव, सांगली, कऱ्हाड, लातूर, जालना, नांदेड, अहमदनगर, पाचोरा, श्रीरामपूर, जळगांव, मालेगांव आणि दौंडाइचा.

**एप्रिल १९६२ च्या पहिल्या तारखेपासून फक्त दशमान वजनेंच कायदेशीर समजलीं जातील.**

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार




